


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १२ वें ] नोव्हेंबर १९५९ [ अंक २

सार-संकलन . . . . . . .
अलिकडील टिळक चरित्रें : ४ : . . प्रा. न. र. फाटक
धर्म आणि लोकसाहित्य—अभिचार किंवा जादुटोणा : २ : कु. दुर्गा भागवत
संभाजीचरित्र, जुनें व नवें . . . श्री. वा. सी. बेंद्रे
तिसरी पंचवार्षिक योजना : १ : . . प्रा. देवदत्त दाभोलकर
जॉन ड्यूई-व्यक्ति आणि कांहीं विचार : २ : प्रा. ग. वि. अकोलकर
मुंबई सरकारचें सीलिंग विषयक विधेयक . श्री. पन्नालाल सुराणा
— पुस्तक-परामर्श —

वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष तेरावें

अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर

१९५९

संपादक-मंडळ

आचार्य **स. ज. भागवत**–श्री. **हरि कृष्ण मोहनी**–प्रा. **वि. म. बेडेकर**

प्रा. **गोवर्धन पारीख** का. संपादक

| | | |
|---|---|---|
| सार-संकलन | | १–७ |
| अलिकडील टिळक चरित्रें : ४ : | प्रा. न. र. फाटक | ८–१८ |
| धर्म आणि लोकसाहित्य – अभिचार किंवा जादुटोणा : २ : | कु. दुर्गा भागवत | १९–२७ |
| संभाजीचरित्र, जुनें व नवें | श्री. वा. सी. बेंद्रे | २८–३४ |
| तिसरी पंचवार्षिक योजना : १ : | प्रा. देवदत्त दाभोलकर | ३६–५१ |
| जॉन ड्यूई–व्यक्ति आणि – कांहीं विचार : २ : | प्रा. ग. वि. अकोलकर | ५२–५९ |
| मुंबई सरकारचें सीलिंगविषयक विधेयक | श्री. पन्नालाल सुराणा | ६०–६६ |
| पुस्तक-परामर्श | | ६७ |

**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून **प्रा. वि. म. बेडेकर** यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाला-मण्डळ-ग्रंथमाला

# धर्मकोश

# संस्कारकाण्ड

भाग १ ला

सुपररॉयल साइज, पृष्ठसंख्या ९००, किंमत ४५ रु.

संस्कारकाण्डाचा प्रथम भाग प्रकाशित झाला आहे. या भागांत संस्कारांसंबंधीं सामान्य विचार, गोत्र, प्रवर व सापिण्ड्य यांसंबंधीं विस्तृत शास्त्रार्थ, विवाहकाल, विवाहाचे प्रकार इत्यादि विषय आलेले आहेत. धर्मशास्त्राचा आधुनिक पद्धतीनें संशोधन करणाऱ्या संशोधकांस व प्राचीन पण्डित-याज्ञिक यांसही हा भाग अत्यंत उपयुक्त असल्यामुळें संग्राह्य आहे.

मिळण्याचें ठिकाण -- प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[ जि० उत्तर सातारा ]

# सार–संकलन

## शास्त्रज्ञ आणि धर्म

केंब्रिज विद्यापीठांतील चर्चमध्यें विद्यापीठाच्या सांत विख्यात व ज्येष्ठ शास्त्रज्ञांचीं धर्मासंबंधानें आपआपले दृष्टीकोण स्पष्ट करणारीं व्याख्यानें झालीं. १९५७ सालीं झालेल्या या व्याख्यानांचा संग्रह आतां हल्लीच्या साऊथ वेल्सच्या बिशपसाहेबांनीं संपादित करून ग्रंथरूपानें प्रसिद्ध केला आहे. संपादक ह्या व्याख्यानांसंबंधानें म्हणतात, "विज्ञान आणि धर्म ह्यांच्यातील कलह पूर्वीच्या मानानें जरी अधिक सौम्य झाला असला, निश्चित विरोधाचें स्थान आतां तटस्थतेनें घेतलें असलें, तरी दोहोंमधील अंतर अजूनहि सांधलें गेलें आहे असें म्हणतां येत नाहीं. धर्मशास्त्र हें सर्व शास्त्रांचें आधिपत्य करणाऱ्या शास्त्रां-ऐवजीं एक बाजूस पडलेलें, किरकोळ महत्त्वाचें शास्त्र समजलें जातें. विद्यापीठांत धर्मशास्त्रज्ञ आणि वैज्ञानिक ( शास्त्रज्ञ ) यांच्यांत खरीखुरी वैचारिक देवघेव अजूनहि होत नाहीं."

प्रस्तुत व्याख्यानांचा परामर्ष घेतांना "दी ह्यूमॅ-निस्ट" या मासिक पत्रिकेच्या सप्टेंबर १९५९ च्या अंकांत श्री. मॉझीन यानें व्यक्त केलेल्या विचारांचा सारांश पुढील प्रमाणें देतां येईल.

धर्म आणि विज्ञान यांच्यांत स्थिर स्वरूपाचा सांधा अस्तित्वांत नसला तरीदेखील या वैज्ञानिकांनीं मैत्रीचें धुकें मात्र निर्माण केलें आहे. त्यांतील बहुसंख्य वैज्ञानिक या ना त्या स्वरूपांत आपण धार्मिक असल्याचें कबूल करतांना आढळतात. तथापि "धार्मिक" शब्दानें व्यक्त होणारी अमूर्त कल्पना उपयुक्त चर्चेचा विषय होऊं शकते काय ? ख्रिस्तीधर्मासंबंधीं देखील कोणत्याहि मर्यादा न घालतां आपण बोलूं शकतो काय ? ईश्वर या शब्दाच्या अर्थाविषयीं एकमत झाल्यावांचून त्याविषयीं चर्चा संभवते काय ? हे खरे प्रश्न आहेत. विशिष्ट धर्मप्रकार, ख्रिस्तीधर्माचें विशिष्ट स्वरूप, अथवा ईश्वराविषयीं असलेल्या अनेक कल्पनांपैकीं एक स्पष्ट कल्पना ही चर्चेस घेतल्यावांचून अशा चर्चेतून कांहीं निघणें कठीण आहे.

मानवतावादी माणूस ख्रिस्तीधर्म मान्य करीत नाहीं कारण तो सत्य असल्याची त्याला ग्वाही देतां येत नाहीं. निर्मात्याचें अस्तित्व तो स्वीकारीत नाहीं. कारण तसें गृहीतकृत्य घेऊन पुढें जाणें त्याला आवश्यक वाटत नाहीं; तें स्वीकारल्यानें प्रश्न सुटण्या-ऐवजीं नवे आणि अधिक प्रश्न निर्माण होतात. अघटित घटना ( मिरॅकल्स ) तो स्वीकारार्ह समजत नाहीं कारण त्या योगानें निर्माण होणारी अनिश्चितता असह्य होईल असें त्यांस वाटतें. आजारांत घेतलेल्या औषधानें कीं एकाद्या अज्ञात धर्मगुरूच्या प्रार्थनेनें गुण आला हें निश्चितपणें कधींच सांगतां यावयाचें नाहीं, या आक्षेपाची विख्यात वैज्ञानिक दखल घेतील असें वाटणें स्वाभाविक आहे. तथापि, तसें करण्या-ऐवजीं ते गडबडतात, गोंधळतात आणि अप्रस्तुत विनयानें, "हा आपला खास विषय नव्हे, या बाब-तीत आपण सखोल दृष्टीकोनांतून कांहीं सांगूं शकणार नाहीं." असें म्हणूं लागतात, हें खेदजनक होय.

प्राध्यापक मॉट म्हणतात कीं, जेव्हां वैज्ञानिक चर्चेला जातो तेव्हां तो आपल्या नेहमीच्या गमका-ऐवजीं सत्याचें वेगळें गमक स्वीकारीत असतो. ख्रिस्ती धर्माच्या आरंभीं वर्णिलेल्या अघटित घटनां-वर तो विश्वास ठेवूं शकेल काय ? याचें उत्तर देतांना ते म्हणतात, "शुद्ध वैज्ञानिक भूमिकेवरून बोलावयाचें झाल्यास एखाद्या दैवी व्यक्तीच्या जन्माच्या वा








मृत्यूच्या समयीं घडलेल्या अशा प्रकारच्या घटनांना आपण आक्षेप घेऊं शकणार नाहीं असें मला वाटतें. मात्र मी या घटना धार्मिक कारणाऐवजीं सौंदर्य (एस्थेटिक) दृष्टीनें स्वीकारूं शकत नाहीं." 'श्रद्धा' म्हणजे "जें खरें नाहीं हें आपणास माहीत आहे त्यावर विश्वास ठेवणें," अशी गमतीदार व्याख्या मॉट यानें केली आहे. जें खरें नाहीं त्यावर प्रेम करावें आणि म्हणून चर्चमधील प्रार्थनांना उपस्थित रहावें असें त्याचें म्हणणें आहे. सर जी. पी. टॉम्पसन म्हणतात, "विज्ञानांत सत्यालाच काय तें महत्त्व आहे. परंतु धर्माचें तसें नाहीं. या दृष्टीनें देशाभिमाना-प्रमाणेंच प्रेम व निष्ठा यावर धर्महि आधारलेला आहे. धर्मतत्त्वें व धार्मिक भावना आणि अन्य ऐतिहासिक घटना यांत फरक करून धर्मतत्त्वें वा सिद्धांत याविषयीं त्यांनीं ते सर्वच खरे असतील असें नव्हे तर त्याकडे तारतम्य दृष्टीनें पहावें लागेल असा दृष्टीकोण मांडला आहे. पण एकाद्या सिद्धां-तांचें कमी अधिक सत्य ओळखावयाचें कसें हा प्रश्न निघतांच टॉमसन म्हणतात, ज्याप्रमाणें स्थापत्य-विषयक सिद्धांतांची यथार्थता त्यांच्या अनुसार बांध-लेल्या पुलावरून करतां येईल त्याचप्रमाणें धार्मिक सिद्धांतांची यथार्थता त्यामुळें घडणाऱ्या नैतिक परिणामांचा निकष लावून ठरविण्यास अडचण नसावी. तथापि हें म्हणणें स्वीकारल्यास धर्मावर अवलंबून नसलेले व स्वतंत्र रीतीनें अस्तित्वांत आलेले नैतिक सिद्धांत गृहीत धरावे लागतात. त्यावाचून त्यांचा गमक म्हणून उपयोग करणें अशक्य आहे.

प्राध्यापक सी. एफ. ए. पॅटीन हे जीवशास्त्रज्ञ म्हणतात कीं, जेव्हां आपण विश्वाची तपासणी करूं लागतो तेव्हां त्याच्या मुळाशीं निश्चित योजना अस-ल्याचें आढळून येतें. डार्विनच्या सिद्धांतामुळें ह्या योजनेच्या कल्पनेला धक्का बसत नाहीं. नैसर्गिक निवड अनुज्ञा देते, रचना करूं शकत नाहीं. जीव-नाच्या निर्मितीला आवश्यक असलेल्या वस्तु वा त्यांचे गुणधर्म नैसर्गिक निवडीचा क्रम सुरूं होण्या-पूर्वी अस्तित्वांत असणें जरूर आहे, आणि योजनेचा संबंध या वस्तु व त्यांच्या गुणधर्मांशीं आहे. येथें एका जुन्या गोष्टीची आठवण होते. लक्षावधि माकडें लक्षावधि टाईपरायटर्सच्या चाव्या सतत दाबत राहिलीं तर त्यांतून कधीं काळीं शेक्सपियरचें सुनीत लिहिलें जाण्याचा संभव आहे असें म्हटलें जातें, पण त्यामुळें त्या सुनीताचा कोणी विशिष्ट निर्माता आहे असें म्हणतां येईल काय ?

प्राध्यापक हॉईल यांनीं "ईश्वर म्हणजेच विश्व, विश्वाचा निर्माता नव्हे", ही कल्पना पुढें मांडली आहे. अस्तित्वांत असलेल्या सर्व विश्वाचेंच नांव ईश्वर आणि म्हणूनच आपण जडवादी असल्याचा दावा करीत असतांना देखील धर्मश्रद्धा नसलेला माणूस आपणांस अजून भेटावयाचा आहे असें त्यांचें म्हणणें आहे. पूर्वी एकदां आइन्स्टाइन यांनीं "विश्वविषयक धार्मिक जाणीव" (कॉस्मिक रिलिजस कॉन्शसनेस) असा शब्दप्रयोग वापरल्याचें प्रसिद्ध आहे. तथापि, या ठिकाणी निसर्ग आणि ईश्वर हे एकच होत हा विचार नेहमीच्या धर्मचर्चेपेक्षां अधिक वेगळ्या अर्थानें येतो हें ध्यानांत घेणें जरूर आहे. अशारीतीनें ही झालेली चर्चा पुन्हा जमिनीवर आणण्याचें काम प्राध्यापक थाऊलेस यांनीं केलेलें आहे. त्यांचें म्हणणें ख्रिस्तीधर्मांतील प्रार्थनेची एलिझाबेथच्या काळांतील भाषा अथवा बायबल-मधील प्रत्येक गोष्ट संपूर्ण सत्य होय असा आग्रह या गोष्टी धर्मानें टाकणें जरूर आहे. सुप्रसिद्ध आंग्ल म्हणीचा उपयोग करून असें म्हणतां येईल कीं स्नानाचें पाणी फेंकून मूल वाचविणें आवश्यक आहे. आणि हें शक्य आहे असा थाऊलेस यांचा विश्वास आहे. तथापि ही स्नानाच्या पाण्याची कल्पना बाजूस टाकली म्हणजे स्पष्ट स्वरूपाचें अधिष्ठान नसलेले नीति नियम काय ते शिल्लक राहतात. आणि या








नीति नियमांना भिन्न अधिष्ठान शोधणें आवश्यक आहे, असें वाटतें.

## ब्रिटिश विद्यापीठांतील राजकारण

"पोलिटिकल् क्वार्टर्ली"च्या जानेवारी– मार्च १९५९ च्या अंकांत रॉजर्स यांनीं ब्रिटिश विद्यार्थी राजकारणांत कितपत भाग घेतात याविषयीं बरीच उपयुक्त माहिती दिली आहे. ती सारांश रूपानें पुढील प्रमाणें देतां येईल.

विद्यार्थ्यांच्या राजकारणांत भाग घेण्याविषयींची माहिती राजकीय संघटनांकडूनच मिळते व त्यामुळें ती कांहींशी अतिरंजित असण्याचा संभव आहे. तथापि अंदाजानें ग्रेट ब्रिटनमधील विद्यापीठांत असलेल्या सुमारें ९५००० विद्यार्थ्यांपैकीं अगदीं चलतीच्या काळांत देखील निरनिराळ्या पक्षांच्या संघटनांची ( विद्यार्थी ) सभासदसंख्या १०००० इतकी असते. यांत प्रमुख स्थान ऑक्सफर्ड व केंब्रिज या दोन विद्यापीठांकडेच जातें. येथें एकूण विद्यार्थ्यांच्या २० टक्के विद्यार्थी असून त्यांतील ७० टक्के विद्यार्थी राजकारणांत भाग घेत असतात. ऑक्सफर्डमध्यें हुजूर, मजूर वा लिबरल् राजकीय क्लबांत वा युनियन सोसायटी या राजकीय संघटनेंत बहुसंख्य विद्यार्थी आढळतात. त्यांची एकूण संख्या ४००० आहे. केंब्रिजमध्यें ही संख्या ३००० इतकी आढळते. इतर सर्व विद्यापीठांत मिळून ७५००० विद्यार्थी आहेत, पण त्यांतील राजकारणांत भाग घेणारे ३०००च. लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्समध्यें ही संख्या सुमारें दहा टक्के इतकी आहे.

ऑक्सफर्ड व केंब्रिज विद्यापीठांना राजकीय परंपरा आहे. बर्मिंगहॅमचा एक अपवाद वगळल्यास आजवरचे सारे पंतप्रधान याच विद्यापीठांचे विद्यार्थी होते. त्यांचें राजकीय वजनहि पुष्कळच आहे. तीन्ही पक्षांचे नेते, पार्लमेंटचे ज्येष्ठ सभासद, महत्वाचे पत्रकार इत्यादि सारे येथें नेहमीं येत असतात. संघटनकार्य सतत सुरू असतें व अभ्यासाकडे दुर्लक्ष झालें तरी ते शिक्षक कांहीं प्रमाणांत सहन करतात. लंडनमध्यें प्रत्यक्ष पार्लमेंटच असल्यानें त्या ठिकाणीहि हा फायदा कांहीं प्रमाणांत मिळतो. तथापि इतरत्र मात्र राजकीय वर्तुळें काढणें वा चालविणें कठीणच. एकादी वादग्रस्त व्यक्ति आल्यास मोठी सभा होते; नाहीं असें नाहीं. पण कार्याच्या सातत्यांच्या दृष्टीनें अशा घटनेला फारसें महत्त्व नाहीं.

विद्यार्थ्यांचा आपणांस पाठिंबा असल्याचा दावा हुजूर व मजूर पक्ष करीत असतात; व त्यांच्या खालोखाल लिबरल् पक्षाचाहि दावा आहे. अलिकडे पक्ष संघटनांच्या कक्षेबाहेरील कांहीं संस्था निघाल्या व वाढल्या आहेत. उदाहरणार्थ हंगेरींतील उठाव दडपला गेल्यानंतर "युनिव्हर्सिटीज ॲण्ड लेफ्ट रिव्ह्यू" हा गट निघाला. मजूर पक्षाची शैथिल्याबद्दल कडक टीका करणारा हा गट आहे. विद्यापीठांतील समाजवाद्यांना एकत्र येण्यास हें एक महत्वाचें व्यासपीठ झालें आहे; उत्साह व विचार यांचा तेथें उत्तम मिलाप झाल्याचें दिसत आहे. विद्यापीठांतील राजकारणाला त्या योगानें उत्तम चालना मिळण्याचा संभव आहे. दुसरें उदाहरण "युनायटेड नेशन्स स्टूडंट्स् असोशिएशन" या संघटनेचें. या संघटनेची सुएजच्या आक्रमणानंतर विशेष वाढ झाली असून आजची सभासदसंख्या ६००० इतकी आहे. विद्यार्थ्यांच्या सद्भावनांना तिच्यायोगें प्रोत्साहन मिळालें असून निर्वासितांसाठीं निधी गोळा करण्यासारख्या प्रत्यक्ष कार्यामुळें त्यांच्या उत्साहालाहि वाव मिळत आहे.

तुलनात्मक विधानें करणें कठीण असलें तरी सामान्यत: तीन वर्षापूर्वीच्या मानानें विद्यार्थ्यांचा राजकारणाबद्दलचा उत्साह वाढत आहे असें म्हणतां येईल; मात्र तो युद्ध संपतांना होता तितका अजूनहि नाहीं. या वाढत्या उत्साहाचा लाभ हुजूर पक्षाला मिळतांना दिसतो. सुएझ आक्रमणाच्या वेळीं या पक्षाविरुद्ध उसळलेली लाट पूर्णतया ओसरली असून



अनुक्रमणिका






विरोधकांना तिचा फारसा टिकाऊ स्वरूपाचा फायदा मिळूं शकलेला नाहीं. तथापि विद्यार्थ्यांच्या मूलभूत दृष्टिकोणाविषयीं निष्कर्ष काढणें कठीण आहे. कित्येक प्रौढ व विचारी विद्यार्थ्यांना राजकीय संघटनांत खरी बौद्धिक चर्चा मुळीं होतच नाहीं; त्यांचें कार्य बव्हंशीं पोरकटच असतें असें वाटतें. संघटनेंत न शिरतां स्वतंत्रपणें विचार करू पहाणारेहि बरेच आहेत. उदाहरणार्थ, फेबियन सोसायटीची सभासद संख्या विद्यापीठांत वाढत आहे. तसेंच हुजूर पक्षाच्या विचारसरणीचा " बौ गट " हाहि बळावत आहे. हें सारें खरें असलें तरी विद्यापीठांतील बहुसंख्य तरुणांच्या ठिकाणीं पक्षीय राजकारणापासून पूर्णतया अलिप्त राहण्याचाच आग्रह दिसतो हेंहि नाकारतां येत नाहीं.

तर मग हे विद्यार्थी समाजापासून अलिप्त आहेत असें समजायचें कीं काय ? असा प्रश्न उत्पन्न होतो. एक तर दहा वर्षापूर्वीच्या मानानें शिक्षकांतील राजकीय आग्रहाची वृत्ति कमी होत आहे. तथापि त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे चालू पिढींतील विद्यार्थ्यांना युद्धपूर्व जग वा युद्धोत्तर जीवनाविषयींच्या अपेक्षा यांचें स्मरण असण्याचें मुळींच कारण नाहीं हें होय. आजच्या प्रथम वर्षाचा विद्यार्थी " बिव्हरीज योजना " प्रसिद्ध झाली तेव्हां दोन वर्षाचा व मजूर पक्ष अधिकारारूढ झाला तेव्हां पांच वर्षाचा होता हें विसरतां कामा नये. तत्कालीन पक्षीय कलहांतले प्रश्न व धोरणें तो आतां मुळीं गृहीतच धरून चालतो आणि वर्तमानकाळचा विचार केल्यास आपणांस पाठिंबा मिळणें आवश्यक आहे अशी हे पक्ष त्याची बौद्धिक खात्री करूं शकत नाहींत; किंवा ज्या गोष्टी त्याला वैयक्तिक दृष्टीनें महत्त्वाच्या वाटतात त्याबद्दल कांहीं सांगतहि नाहींत. उलट, त्यांचे मतभेदाचे विषय हे तज्ञांचे विषय होत आहेत. दोन पेन्शन योजनांतील चांगली कोणती हें नवखा माणूस कसें सांगणार ? कठिण वा गुंतागुंतीचे विषय सामान्य माणसाला समजतील इतपत सोपे करायचे व तसे करतांना पक्षांतील मतभेद मात्र डोळ्याआड होऊं द्यायचे नाहीं हा राजकीय पक्षांपुढचा नेहमीचाच एक प्रश्न आहे. हे मतभेद परंपरागत असले तरी आजहि त्यांना अर्थ आहे हें विद्यार्थ्यांना समजलें पाहिजे. विद्यार्थ्याला राजकीय कार्यकर्त्यांविषयीं घृणा आहे असें नाहीं. परंतु राजकीय मतभेद हे अधिकाधिक प्रमाणांत तज्ञांचा विषय बनत असल्यामुळें सामान्य विद्यार्थ्याची त्यांकडे लक्ष न देण्याचीच प्रवृत्ति आहे.

## इंडोनेशियांतील नवी राजवट

आशिआई लोकशाहीच्या दृष्टीनें इंडोनेशियांत अलीकडे घडलेल्या घटना बऱ्याच खळबळजनक आहेत. इंडोनेशियाचे अध्यक्ष सोकार्नो यांनीं १९५६ सालीं सोव्हिएट रशिया आणि लाल चीन यांचे दौऱ्यावरून परतल्यानंतर " गाइडेड डेमॉक्रसीची " कल्पना पुढें मांडली. " राजकीय पक्ष नाहीसे करा " ही त्यांची त्यावेळची उक्ती प्रसिद्धच आहे. या कल्पनेला अनुसरून गेल्या जुलै महिन्यांत १९५० च्या राज्यघटनेऐवजीं १९४५ च्या पूर्वीची घटना पुनरुज्जीवित करण्यांत आली आणि अशा प्रकारें अध्यक्षीय सत्तेंत भरपूर वाढ होण्यास मदत झाली. यामुळें या राष्ट्रांत हुकूमशाही डोकें वर काढणार कीं काय असा संशय येऊं लागला आहे. पक्षीय राजकारणाची सोकार्नो यांनीं केलेली टीका रास्त आहे. या लहानशा देशांत २६, २७ राजकीय पक्ष आहेत आणि त्यांतील अंतर्गत व एकमेकांशीं सतत चालू असलेली स्पर्धा व कलह ध्यानांत घेतले म्हणजे सामाजिक ध्येय बाजूस पडून सावळा गोंधळ माजण्यांस वाव मिळणें अपरिहार्य आहे. यांतील बहुतेक पक्ष या ना त्या लहान मोठ्या गटाच्या हितसंबंधांतून निर्माण झालेले आहेत. त्यामुळें बहुतेक पक्ष नाहीसे झाल्यास त्या योगानें राष्ट्रीय स्थैर्य मजबूत होईल असें म्हणतां

येतें. तथापि सोकार्नो यांच्या "गाइडेड डेमॉक्रसी"-च्या सिद्धांताची व्यापकता याहून अधिक आहे अशी शंका येते. सुरवातीस त्यांनीं कम्युनिस्ट पक्षाला कॅबिनेट आणि नॅशनल ॲडव्हायसरी कौन्सील या दोनहि संघटनांत सामील करून घ्यावा अशी सूचना केली. तथापि १० वर्षें पूर्वीच्या कम्युनिस्टांच्या बंडाचें स्मरण देशाला असल्यामुळें, ती सूचना मान्य होवूं शकली नाहीं. त्यानंतर कामगार, शेतकरी, बुद्धिवादी, स्त्रिया अशा विविध गटांचे प्रतिनिधी नॅशनल ॲडव्हायसरी कौन्सीलांत घेण्याची कल्पना निघाली. या गटांच्या विविध संघटनांत कम्युनिस्ट हे अधिक कार्यक्षम असल्यानें आणि त्यांची निवड अध्यक्षांनींच करावयाची असल्यानें नॅशनल कौन्सीलमध्यें त्यांचा समावेश होणें सुलभ झालें. विविध प्रश्नांवरील धोरणें सुचविणें व त्यांविषयीं निर्णय घेणें या गोष्टी कौन्सीलवरच सोंपविण्यांत आल्यामुळें साहजिकच पार्लमेंट बाजूस पडलें. १९५५–५६ मध्यें कम्युनिस्टांना उत्तेजन दिलें गेलें होतें आणि त्यामुळं त्यांचें सामर्थ्य वाढीस लागलें आणि याचाच एक परिणाम फेब्रुवारी १९५८ मध्यें सुमात्रांत झालेल्या बंडाच्या रूपानें प्रत्ययास आला. इन्डोनेशियांतील यादवीचा परिणाम म्हणजे लष्कराची सत्ता वाढणें हाच होय.

गेल्या जुलै महिन्यांत जाहीर केलेल्या एका आदेशानुसार आपल्या गाइडेड डेमॉक्रसी या कल्पनेला संस्थात्मक स्वरूप सोकार्नो यांनीं दिलेलें आहे. फ्रेंच राज्यव्यवस्थेंतील नामधारी अध्यक्षपदाऐवजीं अमेरिकन पद्धतीचे अधिकार असलेलें अध्यक्षीय पद आपणांस अधिक पसंत आहे असें त्यांनीं म्हटल्याचें आढळतें. त्याचप्रमाणें १९४५ च्या घटनेंतील दोन कायदेमंडळांचें मिळून बनणाऱ्या पार्लमेंटाऐवजीं एकच "हाऊस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हज" असावें असें त्यांचें म्हणणें आहे. यांतील ५० टक्के सभासद लोकनियुक्त आणि ५० टक्के वर उल्लेख केलेल्या विविध गटांतील नेमलेले असावेत अशी कल्पना आहे. या नेमणुका करावयाच्या सभासदांतील ३५ सभासद हे लष्कर व इतर तत्सम संघटना यांतून घ्यावयाचे आहेत. १९४५ च्या राज्यघटनेंतील वरिष्ठ कायदेमंडळ "पीपल्स कन्सल्टेटिव्ह ॲसेम्ब्ली"चें स्थान यापुढें "नॅशनल ॲडव्हायजरी कौन्सिल" घेईल असा कयास आहे. आणि अध्यक्षीय सत्तेवर त्या घटनेनुसार घालण्यांत आलेलीं विविध बंधनेंहि कमी व्हावयाचीं आहेत. अशा प्रकारें गाइडेड डेमॉक्रसी म्हणजे हुकूमशाहीच्या दिशेनें पडणारें महत्त्वाचें एक पाऊल असा अर्थ ठरण्याचा संभव आहे.

"गाइडेड डेमॉक्रसी"च्या सिद्धांतामधील इंडोनेशियाची विविध प्रकारें विभागणी करणारे गट कितपत एकत्र येऊं शकतील याविषयीं शंकाच आहे. आशियांतील प्रश्न पाश्चिमात्य संसदीय लोकशाहीच्या दृष्टीकोनांतून पाहिले व हाताळले जावूं नयेत, येथील परिस्थितीला अनुरूप असा लोकशाहीला नवा आकार देणें येथें शक्य आहे अशा तऱ्हेचे उद्गार वेळोवेळीं ऐकूं येतात. तथापि त्याचा अर्थ संसदीय लोकशाही नष्ट करणें असा मात्र होता कामा नये. तशातऱ्हेची शक्यता इंडोनेशियांत निर्माण होऊं पहात आहे.

## १९५८ मधील पोलिश शेती

इंटरनॅशनल पेझंट युनियनच्या वतीनें प्रसिद्ध होणाऱ्या पत्रिकेच्या फेब्रूवारी १९५९ च्या अंकांतील पोलिश सरकारचे उपपंत-प्रधान श्रीयुत इग्नार यांनीं प्रसिद्ध केलेल्या आंकड्यावर आधारलेला पोलिश शेतीसंबंधीच्या लेखाचा महत्त्वाचा सारांश पुढील प्रमाणें आहे :

पोलंडमधील रक्तपातरहित क्रांतीनें साधलेली महत्त्वाची गोष्ट म्हणजे १९५६ च्या उत्तरार्धांत तेथील सामुदायिक शेती संपुष्टांत येणें ही होय. पोलिश शेतकऱ्यांना ऑक्टोबर १९५६ मध्यें वैयक्तिक उत्पादन व्यवस्थेकडे वळावेसें वाटलें आणि

स्वयंस्फूर्तीनें त्यांनीं सामुदायिक शेतीची व्यवस्था नाहीशी करावयास लाविली. पोलंडमधील लागवडी-खालीं असलेल्या जमिनीपैकीं आज अवघी १–२ टक्के जमीन सामुदायिक शेतीखाली आहे. आणि या शेतीचा देखील सुमारें ८० टक्के खर्च राज्याला करावा लागतो.

सामुदायिक शेती नष्ट केल्यामुळें १९५६ च्या मानानें १९५७ मधील उत्पादन १५ लक्ष टनांनीं वाढलें. दूधदुभतें आणि मांस यांचेंहि उत्पादन अशाच प्रकारें सुधारल्याचें दिसून येतें. या उत्पादन-वाढीमुळें सर्व अर्थव्यवस्थेवर महत्त्वाचे अनुकूल परिणाम १९५८ मध्यें घडलेले दिसून येतात. १९५७ सालीं कामगारांचे पगार वाढण्यासहि शेतीं-तील सुबत्ता हें महत्त्वाचें कारण होय असें मानता येतें. १९५७ सालीं वैयक्तिक शेतीच्या उत्पादनाला सुरुवात झाल्यानंतर पोलिश शेतकऱ्यांनीं ३६ हजार नवीं घरें, २६ हजार गोठे आणि २९ हजार इतर इमारती बांधल्याचें दिसून येतें. ही सुधारणा १९५८ सालीं अधिक व्यापक प्रमाणांत होत गेली असाहि अनुभव आहे.

सध्यां पोलंडमध्यें सामुदायिक, सहकारी व व्यक्तिगत असें तीन प्रकारचें शेतीचें उत्पादन होत आहे. सामुदायिक शेतींत पुन्हां शेतकऱ्यांचीं सामु-दायिक शेतें आणि राज्याचीं सामुदायिक शेतें असे दोन प्रकार होतात. राज्याचीं सामुदायिक शेतें हींच आतां मुख्य सामुदायिक शेतें म्हणून शिल्लक आहेत. तथापि त्यांचा अर्थव्यवहार ध्यानांत घेतल्यास राज्याला त्यावर किती तरी खर्च करावा लागतो असें दिसतें. तेथील उत्पादनाचें प्रमाण मात्र सरासरी उत्पादनाच्या मानानें कमी आहे.

स्वेच्छेनें चालणारी सहकारी शेती आणि व्यक्ति-गत शेती हे दोन प्रकार मात्र परस्परांना पूरक म्हणून अस्तित्वांत आहेत. व्यक्तिगत शेतीकडे वळलेल्या शेतकऱ्यांच्या दृष्टीनें स्वयंप्रेरित सहकारी श्रम व सहाय्यक संघटना (सर्व्हिस को–ऑपरेटिव्हज्) अस्तित्वांत आणण्याचा महत्त्वाचा प्रयत्न सुरू झाला. सहकारी डेअऱ्या, खरेदी–विक्री संघ आणि पत-पेढ्या हे या संघटनांचे महत्त्वाचे प्रकार होत. ह्यांची सभासद संख्या जवळजवळ ७० लक्ष इतकी दिसून येते. या सहकारी संघटना, सांस्कृतिक, शैक्षणिक, कलात्मक अशा प्रकारचीं कार्येंहि हातीं घेतांना आढळतात. यांचें कार्य कम्युनिस्ट पक्षाचे अधिकारी अत्यंत काळजीपूर्वक पहात असून पक्षाच्या कार्यकर्त्यांची त्यांत खालपासून वरपर्यंत वर्णी लावण्याचें धोरण आतां अवलंबिलें जाण्याचा संभव आहे. तथापि, सामान्य शेतकरी मात्र पक्षाच्या अशा प्रकारच्या प्रयत्नांतून पुन्हां सामुदा-यिक शेतीचा धोका निर्माण होणार नाहींना या चिंतेंत आढळतो.

## तुर्कस्तानपासून मलायापर्यंतचा राजमार्ग – (हाय वे)

'एकाफे'च्या आर्थिक कमिशनच्या हाय–वे सब्–कमिटीनें दक्षिण व आग्नेय आशियासाठीं सात हजार मैलांचा प्रचंड राजमार्ग बांधण्याची योजना संमत केली आहे. या विषयीचा महत्त्वाचा लेख युनेस्को 'कुरिअे'मध्यें प्रसिद्ध झाला आहे. त्यावरून तुर्कस्तानमधील अंकारापासून तेहरान, हेराट, काबूल, पेशावर, लाहोर या मार्गानें दिल्लीपर्यंत येतां येईल आणि पुढें आग्रा, अलाहबाद, कलकत्ता, पूर्व पाकि-स्तान, मंडालेवरून बॅन्कॉक, सायगांव व सिंगापूर-पर्यंत, तसाच प्रवास करतां येईल अशा तऱ्हेचा एक विशाल मार्ग तयार करण्याची योजना आंखली गेली आहे. प्राचीन काळांतील व्यापारी मार्ग दुरुस्त करून एकमेकांशीं जोडणें हा या राजमार्गाचा विशेष आहे. या मार्गापासून वाटेंत बाजूस रहाणाऱ्या महत्त्वाच्या शहरांना जोडणारे मार्गहि तयार करण्याची कल्पना योजनेंत आहे. खिस्तपूर्व १००० वर्षांपासून या प्रदेशांतील व्यापारी मार्ग अस्तित्वांत आहेत. तथापि










त्यांचा उपयोग न झाल्याकारणानें त्यांतील बरेच आज नादुरुस्त अवस्थेंत आहेत. अशा प्रकारच्या आंतरराष्ट्रीय मार्गांचें जाळें तयार करणें आणि मोटारींच्या वहातुकीला योग्य ठरतील अशा स्वरूपांत आवश्यक रस्ते पुन्हां बांधणें ही कल्पना १९५५ सालीं प्रथम सुचली आणि तुर्कस्तानपासून व्हिएतनामपर्यंतचे प्रदेश अशा प्रकारें राजमार्गांनीं जोडण्याचा विचार सुरू झाला. त्यांतून निर्माण झालेल्या विकास योजनेला 'एकाफे' नें या वर्षीं मान्यता दिली आहे. हा विशाल भूप्रदेश तीन महत्त्वाच्या भागांमध्यें ( झोन्समध्यें ) विभागण्यांत आला आहे. पहिल्या झोनमध्यें व्हिएतनाम, कंबोडिआ, लाओ, थायलँड, मलाया आणि ब्रह्मदेश यांतील राजमार्गांचें जाळें येतें. दुसऱ्यांत ब्रम्हदेशाचा पश्चिमेशीं संबंध जोडून पूर्व पाकिस्तान, भारत, सिलोन, नेपाळ आणि पश्चिम पाकिस्तान यांतील राजमार्गांचें जाळें निर्माण करावयाचें आहे आणि तिसरा झोन हा पश्चिम पाकिस्तान, अफगाणिस्तान, इराणपासून तुर्कस्तानपर्यंत पोहोंचणार आहे. अस्तित्वांत असलेल्या मार्गांना एकमेकांशीं जोडणें ही पहिली महत्त्वाची कामगिरी होय असें 'एकाफे'च्या तज्ञांचें मत आहे, आणि त्या दृष्टीनें कांहीं देशांत आरंभहि झालेला आहे. या राजमार्गावरून व्यापारी वहातुक सुरू करावयाची म्हणजे कस्टम्सच्या त्याचप्रमाणें निरनिराळया राष्ट्रांच्या सीमा ओलांडावयाच्या नियमांमध्यें सुलभता निर्माण करणें आवश्यक आहे आणि त्या दिशेनेंहि प्रत्यक्ष आरंभ झाला आहे. हे मार्ग एकदां एकमेकांशीं जोडले गेले म्हणजे सर्वच रस्त्यांचें आधुनिकीकरण करण्याचे कार्यास सुरवात व्हावयाची आहे. या प्रयत्नांतून एकमेकांपासून अलग असलेले दक्षिण आशियांतील देश अधिकाधिक व्यापार करूं लागतील. त्याचप्रमाणें त्यांच्यामधील सामाजिक व सांस्कृतिक दळणवळणहि वाढेल आणि त्यांना परस्परांचा परिचय अधिक चांगल्या प्रकारें होऊं शकेल अशी अपेक्षा आहे. आशिया खंडांनें भविष्याकडे दृष्टी वळविण्याचा निश्चय केल्यामुळें त्याला पोषक अशा तऱ्हेचे हे प्रयत्न अत्यंत महत्त्वपूर्णच म्हटले पाहिजेत.

---





अनुक्रमणिका








प्रा. न. र. फाटक

# अलिकडील टिळक चरित्रें : ४ :

टिळकांच्या ज्या चरित्रग्रंथामागें 'अधिकृत' या महतीसूचक शब्दाची उपाधि लावली गेली, त्या श्री. ताम्हनकरलिखित ग्रंथाचा अल्पसा परिचय पूर्वी एकदां करून दिला. 'अधिकृत' या उपाधीकडे लक्ष पुरवून त्याबद्दल जेवढ्या विस्तारानें लिहावयास हवें होतें, तेवढें पूर्वी लिहिलें नाहीं, म्हणून फिरून एकदां त्याकडे वळणें भाग आहे.

श्री. द. वि. ताम्हनकर हे केसरी पत्राचे विलायतचे वार्ताहर असल्याचें सर्वांना माहीत आहे. वार्ताहर या नात्यानें केसरी संस्थेच्या विश्वस्तांना त्यांच्या विषयीं ममत्व वाटावें, हें स्वाभाविक असलें तरी केसरी संस्थेच्या विश्वस्तांमध्यें तें ममत्व टिळकांच्या 'अधिकृत' चरित्रलेखनाचें काम श्री. ताम्हनकरांकडे सोपविण्याइतकें वेडावलें असेल अशी कल्पना नसल्यानें पुष्कळांना श्री. ताम्हनकरांच्या निवडीबद्दल आश्चर्य वाटलें. श्री. ताम्हनकरांच्या ठिकाणीं या निवडीनें नसता आत्मविश्वास निर्माण झाला व ह्या दारुण आत्मविश्वासानें टिळक चरित्राची ताम्हनकरांच्या हातून जी रचना झाली ती वाचकांना चमत्कारांत लोटणारी आहे. त्यांनीं या रचनेंत नाट्य, काव्य इत्यादि गुण आणून सोडण्यासाठीं जी दृष्टि स्वीकारली, तिचा अनुभव 'विषयोपन्यास' ( Prelude ) या पहिल्या प्रकरणांतच येतो. तथापि विषयोपन्यासापूर्वी श्री. ताम्हनकरांना टिळकचरित्राची आवश्यकता ज्या अनुभवाच्या आधारें पटली तो अनुभव व त्यावरील त्यांचें व्याख्यान हीं पहाण्यासारखीं आहेत.

टिळक चरित्राची आवश्यकता हृदयावर ठसण्यापूर्वीं त्यांनीं टिळकचरित्राचा खर्डा तयार केला होता, हें न विसरतां श्री. ताम्हनकरांचा अनुभव नजरेखालीं घातल्यास त्या अनुभवाचा खरेपणा धोक्यांत पडतो; पण श्री. ताम्हनकरांनीं टिळक चरित्राची आवश्यकता सिद्ध करण्यासाठीं काढलेली शक्कल बनावट वाटली तरी धकवून घेण्याइतपत कुशल आहे. स्वयंकृत चरित्राचें हस्तलिखित छापण्याच्या हेतूनें श्री. ताम्हनकरांनीं लंडनमधील कोणा छापखान्याच्या प्रतिनिधीला घरीं बोलावून तें वाचायला सांगितलें. तर तो बोलून गेला कीं, 'तुमचें पुस्तक ब्रिटिश–विरोधी स्वरूपाचें आहे काय ? तुम्हांला माहीत आहेच कीं टिळक हा आमच्या साम्राज्याचा मोठ्यांतला मोठा शत्रु होता.' त्या ब्रिटिश साहित्य-दलालाचे हे उद्गार कानावर येतांच लेखकाचा जीव खालीं पडला. त्यांच्या अंतरंगांत कृतार्थतेच्या स्फुरणानें चर्चिल, पं. नेहरू यांच्यासारखेच टिळक आजसुद्धां जिवंत आहेत. असा विश्वास स्थिरावला. टिळकांच्या मृत्यूनंतर छत्तीस वर्षें ( १९५६ ) लोटलीं तरी त्यांच्या कर्तबगारीचा प्रभाव मुळींच मागासलेला नाहीं. त्यांच्या जीवनकालांत ह्या कर्तबगारीला जें महत्त्व होतें तेंच आजदेखील कायम आहे. इतिहास निर्माण करणाऱ्या व्यक्ति चिरंजीव असल्यानें काळाचे फेरबदल त्यांना बाधत नाहींत. ज्यांचें नांव निघतांच वादाचें वादळ उद्भवतें आणि भावना उचंबळतात तेच खरे चिरंजीव ठरतात; वगैरे आशयाचें तत्त्वज्ञान पूर्वोक्त विश्वासाला सांवरण्यासाठीं श्री. ताम्हनकरांच्या चित्तांत बळावलें व लेखणींतून किंवा टंकयंत्रातून कागदावर उतरलें. श्री. ताम्हनकरांचा वरील संवाद खरा नसावा असा संशय उत्पन्न होण्याला त्यांत जागा आहे. ब्रिटिश साम्राज्य संपल्यावर ७–८ वर्षांनीं टिळकांच्या शत्रुत्वाचें स्मरण ठेवण्याचें इंग्रज इसमाला कारण काय ? शिवाय ब्रिटिश राज्याचा द्वेष करणारांचें वाङ्मय इंग्लंडांत छापलें जात नाहीं असेंहि नाहीं. याप्रमाणें शहानिशा करूं लागल्यास ह्या संवादाचा पोकळपणा गळीं उतरूं लागतो. परंतु ही शहानिशा सोडून ताम्हनकरांच्या इतर लेखनाकडे वळावें हें बरें. टिळकांच्या कर्तबगारीचें स्वरूप व फळ काय हा प्रश्न लटकत राहूं नये म्हणून श्री. ताम्हनकरांनीं जें विवेचन केलें आहे, तें असेंच नमुनेदार असल्यानें त्याची पहाणी बोधप्रद होईल.

टिळकांच्या जन्मापासूनच्या-जन्मानंतरच्या (१८५६ ते १९५६) शंभर वर्षांत (The hundred years since Tilak's birth) ब्रिटिश साम्राज्य वैभवाच्या शिखरास चढून जेव्हां त्याची सुरक्षितता खालावूं लागली तेव्हां ब्रिटिशांनीं दडपशाही आरंभली. ब्रिटिश साम्राज्याची कोनशिला जें हिंदुस्थान तेथें राष्ट्रीयत्वाची खळबळ माजून स्वातंत्र्याची तहान वाढत चालली. स्वातंत्र्यसंपादनाचें कार्य मांजराच्या गळयांत घंटा बांधण्यासारखें दुष्कर होतें. तें टिळकांनीं केलें. त्यांनीं ब्रिटिशांच्या श्रेष्ठत्वाची व इभ्रतीची भूल लोकांच्या मनांतून पिटाळली, स्वार्थत्याग आणि क्लेश सोसून त्यांनीं मुमुक्षु (स्वातंत्र्याकांक्षी) राष्ट्रीयत्व चेतविलें. त्या योगानें लोकांच्या वृत्ति लढाऊ बनल्या व शेवटीं अशा वृत्तींच्या बलाढ्यतेनें ब्रिटिशांना हिंदुस्थान सोडावें लागलें. ब्रिटिशांचें साम्राज्य निकालांत निघतांच डच फ्रेंचांच्यासारखीं इतर साम्राज्यें धडाधड कोसळून पडलीं आणि युरोपियन वर्चस्वाच्या मगरमिठींतून आशिया मोकळा झाला.

टिळकांच्या कामगिरीवर श्री. ताम्हनकरांनीं टाकलेला हा प्रकाशाचा स्रोत नजरबंदीचा आहे. १८५६ ते १९५६ हा ब्रिटिश साम्राज्याच्या वैभवोन्नतीचा काळ हें पहिलेंच विधान बुद्धीला बधिर करून सोडणारें आहे. (कारण १९४७ मध्यें भारताला स्वराज्य मिळालें) सुरक्षितता खालावूं लागणें व तिनें दडपशाहीचें साह्य घेणें या घटना प्रस्तुत शंभर वर्षांतच घडल्या असें जमेस धरणें भाग आहे; तसेंच राष्ट्रीयत्वाची खळबळ आणि स्वातंत्र्याची तहान केव्हांची याचें उत्तर वाचकांनींच काढावें. टिळक राजकारणाच्या क्षितिजावर प्रगटले त्या वेळेपर्यंत स्वातंत्र्य कसें मिळवायचें या पेंचावर तोड सांपडली नव्हती. टिळकांनीं त्या पेंचावर तोड काढली. ब्रिटिशांच्या वरचष्म्याचें भय टिळकांनीं लोकांना सोडायला लावलें व स्वोद्धारेच्छु राष्ट्रीयत्व शिलगवलें; तेंच पुढें लढाऊ बनलें आणि त्याच्यासमोर शेवटीं ब्रिटिशांना पळ काढण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं. याप्रमाणें हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यलोपाचें सगळें श्रेय टिळकांच्या पदरांत टाकणें शक्य नसलें तरी त्याच्या हिस्सेरशीची कटकट सोडून द्यायला हरकत नाहीं. पण हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्य मावळतांच डच फ्रेंचांचीं साम्राज्यें धुळीस मिळालीं हा निष्कर्ष जसा अचाट (जपानच्या स्वारीनें हीं साम्राज्यें मोडलीं हें प्रसिद्ध आहे.) तसाच हीं साम्राज्यें जातांच सारा आशिया युरोपच्या जोखडांतून सुटला हा निष्कर्ष देखील अचाट आहे. डच फ्रेंच यांचीं साम्राज्यें ब्रिटिशांची सत्ता हिंदुस्थानांतून उठल्यामुळें जमीनदोस्त झालेलीं नाहींत. त्यांना जपानच्या पराभवानंतर कम्यूनिझमच्या प्रभावानें पोखरून काढलें. चीन देश याच प्रभावानें स्वतंत्र झाला. बलाढय व स्वतंत्र जपान देशानें अमेरिकेपुढें लोळण घेतली. मलाया कालपर्यंत ब्रिटिशांच्या पकडींत होता. टिळक हे साऱ्या आशिया खंडाच्या राजकीय मोक्षाचे जनक या श्री. ताम्हनकरांच्या लाडक्या कल्पनेसाठीं आशियाखंडाच्या गेल्या १५-२० वर्षांतील भौगोलिक व ऐतिहासिक घडामोडी विसरणें वाचकाला प्राप्त आहे.

या प्रस्तावनेनंतर श्री. ताम्हनकरांचा ग्रंथारंभ पाहिल्यास नवा चमत्कार वाटणार नाहीं. ते म्हणतात– 'ते पावसाळयाचे दिवस होते तरी पूर्व दिशेच्या वैभवानें त्यादिवशीं मुंबईत सूर्योदय झाला. मुंबईचे लोक झोपेंतून उठले व नेहमीप्रमाणें आपापल्या उद्योगास लागले. (पुढें उद्योगांची तुरळक यादी आहे) तो दिवस म्हणजे २७ जुलै १८९७. सकृद्दर्शनीं आणखी एक दिवस याहून मुंबईच्या लोकांना धकाधकीच्या दैनंदिन जीवनांत त्याचें महत्त्व जास्त वाटण्याजोगें नव्हतें.

"त्यादिवशीं अरबी समुद्रांत सूर्य बुडण्यापूर्वी दैव आणि इतिहास यांच्या सामन्यांतील निर्णायक झटापटीच्या प्रेक्षकाची भूमिका आपल्या वाट्यास येणार असल्याचें मुंबईकरांच्या ध्यानींमनींहि नव्हतें. ही झटापट ब्रिटिश राज्याचा शेवट घडवून आणणारी होती. त्या दिवशीं बाळ गंगाधर टिळक नांवाच्या गृहस्थाला राजद्रोहाच्या आरोपाखातर पकडण्याच्या वारंटावर चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटानें सही केली. मॅजिस्ट्रेट बलाढ्य ब्रिटिश साम्राज्याचा प्रतिनिधि असला तर टिळक जित पण स्वातंत्र्याग्रही राष्ट्राचे प्रतिनिधि होते. आपलें राज्य आहे तसेंच चिरंतन रहावें ही त्या इंग्रजाची इच्छा तर भारताच्या अमर्याद भावी उन्नतीचा पुरस्कर्ता तो भारतीय होता. भारताच्या भवितव्याचीं सूत्रें दैवयोगानें त्यावेळीं टिळकांच्या हातांत आलीं. पुढें पन्नास वर्षें हीं सूत्रें विणलीं जाऊन शेवटीं इतिहासाचा प्रवाह बदलला."







श्री. ताम्हनकरलिखित टिळकचरित्राच्या पहिल्या पानावरील दोन परिच्छेदांचा हा सारांश आहे. त्यापुढें टिळकांच्या १८९७ मधील राजद्रोहाच्या खटल्याचा गोषवारा असून शेवटीं त्या खटल्याचें तात्पर्य अंधळ्या श्रद्धेच्या अतिशयोक्तीनें वर्णिलेलें आहे. " ज्या कैद्यानें ( टिळकांनीं ) ब्रिटिश राज्याचा वचक तुच्छ लेखला, त्याच्या संबंधांत इतिहासकारांना कबूल करावें लागलें कीं, तो कैदी हिंदी नव्हे तर आशियांतील लोकशाहीचा विधाता ठरतो ... "

" देशाच्या समकालीन इतिहासाच्या व आशियांतील क्रांतीच्या जिज्ञासूला टिळकांचें चरित्र व त्यांचा काळ यांच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं ... "

१८९७च्या पावसाळ्यांतील विशिष्ट दिवशीं होणाऱ्या सूर्याच्या अस्तोदयाला चरित्रलेखनांत स्थान देणें, हें लेखनाचें बाळसें कृत्रिम कदाचित् कुणाला हृदयंगम वाटेल. पुष्कळांना तसें वाटणार नाहीं. त्या दिवशीं टिळकांना पकडलें व त्याच्या परिणामीं ब्रिटिशांच्या राज्यनाशाचा पाया भरला गेला, ही विलक्षण अतिशयोक्ति आहे. टिळकांनीं त्या खटल्याला धीरोदात्तपणें न डगमगतां तोंड दिलें, या वीरगुणांचा अर्थ त्यांनीं ब्रिटिश राज्याला सुरुंग लावला असा करून टिळकांच्या महतीला अवास्तव रूप चढविणें हें अंधश्रद्धेला शोभेल. टिळकांची तत्कालीन मनःस्थिति अशा तऱ्हेच्या महतीचा पाठपुरावा करणारी नाहीं. 'तुम्ही तसाच मी आपल्या अंतःकरणांत ब्रिटिश राज्यासंबंधानें कोणतीहि दुष्ट भावना पोसण्याला असमर्थ आहे.' असा त्यांचा सिद्धान्त १८९७ मध्यें खटला संपण्यापूर्वीं त्यांनीं आपल्या मित्रास पाठविलेल्या पत्रांत आहे. १८९९ 'पुनश्च हरिः ॐ' म्हणतांना टिळकांनीं आपल्या कर्तबगारीची जी दिशा उघडकीस आणली आहे तीसुद्धां ब्रिटिश राज्याच्या विध्वंसाची नाहीं. कायद्याची धार कितीहि सूक्ष्म असली तरी आपण आपल्याला इजा न होऊं देतां इष्ट तें कार्य करीत राहूं. अशा अर्थाचीं टिळकांचीं वाक्यें त्या लेखांत अभ्यासकाला पुष्कळदां सांपडतील.

१८९७ च्या खटल्याचा आशियाव्यापी भव्य परिणाम दाखविणारे श्री. ताम्हनकर प्रत्यक्ष त्या खटल्याची हकीकत सादर करतांना पूर्वीच्या विशाल दृष्टीला कां अंतरावे तें समजत नाहीं. त्या हकीकतींत त्यांनीं खटल्याच्या परिणामाला स्वदेशाच्या चतुःसीमेंत अडवून ठेवलें आहे व कोणा अर्वाचीन हिंदी इतिहासकाराच्या मतानुवादानें 'टिळकावरील पहिल्या राजद्रोहाच्या खटल्यानें ब्रिटिश सत्तेपुढें लोटांगण घालण्याचें घाणेरडें युग कायमचें निकालांत निघालें.' असा निष्कर्ष श्री. ताम्हनकरांनीं वाचकांपुढें टाकला आहे. त्या निष्कर्षाला त्यांनीं जी पुस्ती जोडली ती पुढील दणदणीत आशयाची आहे:- " टिळकांनीं ब्रिटिशराज्याला बुद्धिपुरस्सर धिक्कारून ( deliberate defiauce ) नवें युग जन्मास घातलें; पूर्वीचा तो गरीब हाडांचा व मऊ मनाचा भारतीय टिळकांच्या खटल्यानंतर १८९७ सालीं मेला आणि परक्या राज्यसत्तेला आव्हान देणारा नवा भारतीय जन्मास आला. १८९७ नंतरचा भारतीय राजकारणाचा इतिहास वरच्यापैकीं 'गरीब हाडांचा हिंदी मनुष्य मेला' वगैरे विधानांचा उचलून धरणारा नाहीं. टिळकांच्या अंतःकरणांत ब्रिटिश राज्याविषयींचा धिक्कार खटल्याच्या वेळीं नव्हता. प्रबळ स्वाभिमान मात्र होता. खटल्यांत त्यांनीं माघार घेतली नाहीं ती स्वाभिमानामुळें, धिक्कार वृत्तीमुळें नव्हे हें श्री. ताम्हनकरांनीं दिलेल्या खटल्याच्या माहितींतच दिसून येणारें आहे. पण श्री. ताम्हनकरांना हें कसें रुचावें ? टिळकांच्या 'पुनश्च हरिः ॐ' मध्यें टिळक स्वराज्यसिद्धीचें कर्तव्य उच्चारीत आहेत, असें श्री. ताम्हनकरांनीं गृहीत केलें असून त्याप्रमाणें त्या लेखाचा सारांश इंग्रजी भाषेंत दिला आहे. टिळकांचे मूळ शब्द त्यांचें खरें मनोगत व्यक्त करणारे नाहींत, अशा ग्रहानें श्री. ताम्हनकर कंसांत त्याचा अर्थ देतात. याचा परिणाम वाचकांवर दोन प्रकारें घडतो. टिळक शब्द एक व अर्थ दुसराच असा भाषाप्रयोग करणारे छद्मी गृहस्थ होते, हा एक परिणाम. पण त्यांनीं वापरलेल्या शब्दाचा आज ताम्हनकर उघडकीस आणतात तो इंगितार्थ केसरीच्या वाचकांना मात्र त्या त्या वेळीं बिनचूक समजत होता हें धरून चालायला पाहिजे. आम्हास 'ज्या गोष्टी कर्तव्य आहेत त्या राजद्रोहाच्या नाहींत.' ( पुनश्च हरिः ॐ ) या वाक्यांतील टिळकांच्या कर्तव्यगोष्टी राज्य उलथून पाडण्याइतक्या तीव्र राजद्रोहाच्या आहेत, असा ताम्हनकरांच्या मतें अर्थ करायला हवा. यावरून टिळक अप्रामाणिक होते, असें वाटावयास










लावणारा परिणाम अनिष्ट म्हणून झिडकारला तर ताम्हनकरांना कोणत्या, कुणाच्या व केव्हांच्या वरदानानें टिळकांच्या शब्दांचे खरे अर्थ सुचविणारी विद्या प्राप्त झाली, हा प्रश्न म्हणजे दुसरा परिणाम. हे दोन्ही परिणाम श्री. ताम्हनकरांविषयींच्या विश्वसनीयतेला रसातळास नेणारे आहेत.

टिळकांची भूमिका ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याच्या ध्येयाची कधींच नव्हती. सरकारच्या कारभाराची अडवणूक म्हणजे सरकारला ताळ्यावर आणण्याचा एक हटकून गुणकारी उपाय, अशी टिळकांची पक्की समजूत त्यांच्या १९०६ नंतरच्या लेखांच्या साह्यानें सिद्ध करणें अवघड नाहीं. परंतु श्री. ताम्हनकरांनीं टिळकांना अवतार कोटींतले ठरवून त्यांचें जीवन चितारण्याची ईर्ष्या धरल्यामुळें त्यांना टिळकांच्या कर्तृत्वावर अतिरेकी अतिशयोक्तीचा भडक रंग फासण्याशिवाय गत्यंतर उरलें नसावें. यामुळें त्यांच्या लिखाणांत पुष्कळदां असंबद्धतेचा अवास्तवतेचा गोंधळ उडालेला दिसतो. वस्तुतः ' अधिकृत ' ही संज्ञा आपल्या ग्रंथास जोडणारानें जो संयम राखणें अवश्य होतें, त्या संयमाची जाणीव त्यांच्या लेखनांत नाहीं. ' अधिकृत ' ही संज्ञा अत्यंत विश्वसनीयतेच्या जबाबदारीची सूचक आहे. ती जबाबदारी पार पाडतांना आपल्या लेखनांतील महत्त्वाचीं कथनीयें साधार म्हणजे शक्य तोंवर बिनचूक व समोर असलेल्या पुराव्याच्या कक्ष्येंतील पाहिजेत याचें भान श्री. ताम्हनकरांनीं ठेवलेलें नाहीं. टिळकांनीं तुरुंग पत्करून ब्रिटिश राज्याला सुरुंग लावला व त्याच्या स्फोटानें सारें आशियाखंड खडबडून जागें झालें, लोकशाहीच्या दिशेनें ह्या खंडांतील जनता आपलीं पावलें टाकूं लागली हें १८९७ तील टिळकांच्या खटल्यांतून श्री. ताम्हनकरांनीं काढलेलें तात्पर्य इतक्या अतिव्याप्तीचें आहे कीं तें तत्कालीन वस्तुस्थितीच्या बाहेरच सदैव राहील. १८९७ मध्यें एका जपान खेरीज बाकीचे ( भारताच्या पूर्वपश्चिमेचे ) सारे आशियाई देश इतक्या विपन्नावस्थेंत बुडालेले होते कीं, टिळकांच्या खटल्याकडे तेथील लोकांचें लक्ष वेधण्याचीच शक्यता नव्हती, मग त्याचें चिंतनमनन करून त्यांनीं लोकशाहीचा धडा शिकण्याची गोष्टच काढायला नको.

श्री. ताम्हनकरांनीं टिळकांना अवतारांत गणल्याचा निर्देश वर आला आहे. त्याचा पुरावा ' टिळकांच्या पूर्वीची स्थिति ' या प्रकरणाच्या आरंभींच वाचकाच्या नजरेपुढें येतो. १८१८ मध्यें पेशवाई संपल्यावर ब्रिटिश राज्यकारभारानें जें परिवर्तन आरंभलें, त्याची चुटपुटती माहिती देऊन १८५७ च्या शिपाईगर्दीचा खऱ्याखोट्या गोष्टींच्या उल्लेखानें अगदीं क्षुद्र स्वरूपाचा आढावा सांगितल्यावर श्री. ताम्हनकरांनीं लंडनटाइम्सच्या २३ जुलै १८५६ च्या ( ह्या टिळकांचा जन्म दिवस ) अंकांतील एक लांबलचक उतारा दिलेला आहे. त्या उताऱ्यांत पुढील विषय आहे. :– हिंदी राज्यकारभाराच्या पार्लमेंटांतील चर्चेत कुणाला रस वाटत नाहीं; ४०–५० सभासद म्हणजे पराकाष्ठा. जमाखर्चाच्या हिशोबांत बेबंदशाही असून विलायतेंहून या कामांतलीं वाकबगार माणसें पाठविण्याला कंपनीनें नकार दिला. फौजदारी कायदा अंमलांत आणण्याची उपेक्षा–हिंदी राज्यकारभाराच्या चर्चेचें पार्लमेंटला महत्त्व वाटत नाहीं, ही बाब वगळून बाकीच्या गोष्टीबद्दल हिंदुस्थानांतील गोऱ्या नोकरांचा विरोध, असा खुलासा टाइम्सनें केलेला आहे. हिंदुस्थानांत खरें लोकमत म्हणजे जनतेचें मत अस्तित्वामध्यें नाहीं, त्याच्या अभावीं हिंदी मत ( Indian opinion ) असें नांव कंपनीच्या हिंदुस्थानांतील गोऱ्या नोकरांच्या मताला दिलें गेलें आहे. हिशोबांतील अस्ताव्यस्तपणाला आळा घालणें अनिष्ट असें या नोकरांचें मत आहे, कारण यथेच्छ चरण्याला मग सवड मिळणार नाहीं. वशिल्यानें नोकऱ्या मिळतात म्हणून उमेदवारांच्या परीक्षेची चढाओढ पूर्वोक्त हिंदी मतांला अमान्य आहे. वशिल्यांचा तट्टांना कंपनीच्या नोकरींत परीक्षेच्या स्पर्धेमुळें शिरतां येणार नाहीं, यासाठीं अशी स्पर्धा नको, वगैरे धोरणाची मीमांसा करून ( सदर उताऱ्याप्रमाणें ) टाइम्सकारानें शेवटीं म्हणणें आहे कीं ज्याच्या शिरावर कंपनीच्या राज्यकारभाराचा बोजा आहे, त्या मंत्र्यानें असल्या स्वार्थी मताची मात्रा स्वतःवर चालू देणें योग्य नव्हे.

हिंदी मत ज्याला समजतात त्याचें स्वरूप टाइम्सनें स्पष्ट केलें आहे. खऱ्या अर्थानें हिंदुस्थानांत लोकमत नाहीं, अशी केवळ वस्तुस्थिति टाइम्सनें दर्शविली आहे. त्या विधानांत भाकिताचा ध्वनि मुळींच नाहीं, तरी त्या विधानावर तें विधान भविष्यार्थक ( prophetic ) असल्याची कल्पना लादून जें जें नाहीं तें तें



अनुक्रमणिका






अस्तित्वांत यावें याकरितांच (जणूं) टिळकांचा ज्या तारखेस टाइम्सनें लेख छापला त्याच नेमक्या तारखेस जन्म झाला, अशी श्री. ताम्हनकरांनी आपली मल्लीनाथी खेळविली आहे. टिळकांनीं आपलें सारें आयुष्य टाइम्सनें दाखविलेल्या उणीवा काढून टाकण्यांत वेंचलें, हें थोडेसें खरें पण त्या घटनेंचा टाइम्सच्या लेखाशीं संबंध काय ? ज्या क्षणीं एकीकडे देव मानवांच्या गाऱ्हाण्यांची घोषणा त्याच क्षणीं त्या गाऱ्हाण्यांच्या निवारणार्थ दुसरीकडे कुठेंतरी विष्णूचा अवतार व्हावा, या पौराणिक पद्धतीचें सहज स्मरण व्हावें, अशीं ही टाइम्सच्या लेखाची व टिळकांच्या जन्माची श्री. ताम्हनकरांनीं घातलेली सांगड आहे.

टिळक रत्नागिरीस समुद्रकांठीं जन्मास आले; म. गांधी देखील पोरबंदरास म्हणजे समुद्रकांठींच जन्मास आले अशी आणखी एक सांगड त्यांनीं अन्यत्र दाखविली आहे. दोघांचीं जन्मस्थानें पश्चिमेच्या समुद्रकांठीं, दोघांच्याहि रक्तांत समुद्र संचारलेला म्हणून पश्चिमेकडील समुद्रमार्गानें येणाऱ्या इंग्रजांचें राज्य घालविण्याला ते सज्ज व समर्थ झाले, असें भाष्य श्री. ताम्हनकरांनीं करायलाच हवें होतें व त्यांनीं तें केलें आहे. या कल्पनाविलासांत देखील ताम्हनकरांच्या ऐतिहासिक अज्ञानाचा भाग बराच आहे. बेटावरील राज्यकर्त्यांना समुद्रकांठीं जन्मणारांनीं जिंकलें पण त्या जलचरांनीं पहाडी व मैदानी लोकांना जिकलें हा मुद्दा ताम्हनकरांना सुचला असता तर त्यांना आपल्या कल्पनेचा खेळ बालिश वाटला असता.

पेशवे चित्पावन ब्राह्मण तसेच टिळकसुद्धां चित्पावन ब्राह्मण ही माहिती देतांना श्री. ताम्हनकरांनीं पेशवे घराण्याच्या पूर्वजांनीं मुसलमानांच्या जुलमांतून सुटण्याकरितां कोंकणाला रामराम ठोकल्याचा व शाहू छत्रपतीच्या पदरीं नोकरी धरल्याचा उल्लेख केला आहे. येथवर ठीक आहे. 'त्यांच्या मागून पुष्कळ चित्पावन ब्राह्मणांनीं त्यांचा कित्ता गिरविला व मराठ्यांच्या लष्करांत सेनापतींच्या जागा पटकावल्या' या श्री. ताम्हनकरांच्या विधानांत मागून येणारे कोण व त्यांनीं केव्हां सरदाऱ्या कमावल्या याचें उत्तर नाहीं. पण 'मागून आलेल्यां'च्या संदर्भात 'त्यांमध्यें (एक) बाजीराव भट होता, त्यानें हैद्राबादच्या शिरजोर निजामाचा पराभव केला आणि मोगल बादशाहाचे मोठे-मोठे प्रदेश जिंकले. त्याच्या पराक्रमानें साऱ्या हिंदुस्थानांत मराठ्यांचें वर्चस्व स्थापन होण्याचा मार्ग मोकळा झाला, असा मजकूर आहे. पेशव्यांच्या पूर्वजांनीं सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात कोंकण सोडलें, त्यांच्या मागून दुसऱ्या पुष्कळ ब्राह्मणांनीं कोंकण सोडण्याची प्रथा स्वीकारली, त्यांत बाजीराव भट होता, (पान. ९) ही श्री. ताम्हनकरांची इतिहासज्ञता अद्भुत नाहीं असें कोण म्हणेल ?

नंतर 'शंभर वर्षांपूर्वी गंगाधर रामचंद्र टिळक या नांवाचा एक शाळापंतोजी आपली बायको पार्वतीबाई हिच्यासह रत्नागिरीस रहात होता.' अशा रीतीनें टिळकांच्या जन्मकथेला श्री. ताम्हनकरांनीं प्रारंभ केला आहे. टिळकांचा जन्म झाला, पुढें सहाव्या दिवशीं षष्ठीपूजन झालें. हा सोहळा सांगण्याची गरज किंवा संगति टिळकचरित्रांत कशी उत्पन्न होते, हें एक श्री. ताम्हनकरच सांगूं शकतील. येथून पुढें टिळकांच्या पणजा, आजा, या पूर्वजांची कहाणी आटपून वडिलांचा तुटपुंजा पगार, त्या काळची स्वस्ताई व काटकसरीचा संसार, त्यांचा द्रव्यसचय, टिळकांच्या मातुःश्रीचा मृत्यु, टिळकांचें लग्न, टिळकांचा पितृवियोग असा कथाभाग नमूद आहे. टिळकांचा पणजा केशवराव, आजा रामचंद्रपंत, वडील गंगाधरपंत याप्रमाणें राव, पंत या बहुनामवाचक शब्दानें भूषविलेलीं तीन पिढ्यांचीं नांवें पहातां पहातां टिळकांचा चुलता कोण तर 'गोविंद', हें नांव दिसतांच वाचक बुचकळ्यांत पडतो. 'गोविंद' या एकेरी नांवानें त्याची संभावना व्हावी, असें त्याचें महत्पाप कोणतें हा प्रश्न वाचकासमोर उभा राहतो. टिळकांचा संभाळ जिनें गंगाधरपंतामागून केला त्या व्यक्तीच्या नांवापुढें 'राव' शब्द घातल्यानें फार जागा अडणार होती, असाहि प्रकार नाहीं. गोविंद व त्याची बायको यांचें आपल्या बुद्धिमान् पुतण्यावर अतिशय प्रेम होतें व या पुतण्याच्या अंतरंगांत चुलत्याविषयीं फार आदर होता, असें निवेदन करणाऱ्या श्री. ताम्हनकरांनीं चुलत्यापुतण्यांच्या एकमेकांतील प्रेमादराची जी कदर केली आहे, ती विचित्र आहे. टिळकांचें लग्न झालें तेव्हां त्यांच्या वधूचें नांव ठेवलें तापीबाई. The bride was named Tapibai. परंतु सर्वतो मुखी नांव आहे सत्यभामाबाई. २०४-२०५ या पानांवर सत्यभामाबाई

याच नांवानें त्यांचें निधन नोंदलें आहे. श्री. ताम्हनकरांची ही कलम बहाद्दरी ' गोविंद 'प्रमाणेंच विचित्र आहे. तसें पाहिलें तर बाई तीच ना मग तिचें नांव तापीबाई असो कीं सत्यभामाबाई असो, त्याची जिकीर कशाला पाहिजे असेंहि समर्थन करतां येईल.

' बाळपण व शिक्षण ' या प्रकरणांत श्री. ताम्हनकर झाले तरी काय सांगणार ? टिळकांच्या बाळपणासंबंधांतील ज्या सुप्रसिद्ध आख्यायिका आहेत त्यांपैकीं कांहींचा पाढा श्री. ताम्हनकरांनीं आपल्या शैलीनें वाचला आहे. त्यांत डेक्कन कॉलेजांतील ' शूट ' नांवाच्या प्रोफेसराचा टिळकांना इंग्रजी कल्पना व इंग्रजी वाङ्मय यांची योग्य ओळख होण्याबाबत उपयोग झाला असें श्री. ताम्हनकरांनीं लिहिलें आहे. शूटबरोबर वर्डस्वर्थचेंहि नांव आहे. हा ' शूट ' कोण व तो डेक्कन कॉलेजांत टिळकांच्या विद्यार्जनकाळीं होता कीं नव्हता, याची चर्चा पूर्वीं एकदां झाली आहे. टिळकांच्या एका सहाध्यायानें टिळक वारल्यावर आपल्या आठवणींत शूटचें नांव प्रथम आणलें. त्यानंतर त्या आठवणीचा अनुवाद अनेक लहानथोर टिळकचरित्रकारांनीं केला व तशा अनुवादाची री श्री. ताम्हनकरांनीं आपल्या एरवीच्या चौकसपणाला फाटा देऊन ओढावी, याला गतानुगतिकत्वाखेरीज दुसरें नांव शोभणार नाहीं. प्रस्तुत प्रकरणाच्या शेवटीं टिळक आगरकर उपासनी या त्रयीचा कॉलेजांतील काल्पनिक संवाद जोडून श्री. ताम्हनकरांनीं फिरून एकदां आपल्या गतानुगतिकत्वाची साक्ष पटविली आहे. टिळक वारल्यावर हा संवाद जुळविला गेला. संवादांत भाग घेणाऱ्या दोन व्यक्ति कालोदरांत विलीन झालेल्या, मूळ संवादाचा काळ चाळीसबेचाळीस वर्षांइतका मागचा, आणि हा संवाद निर्माण करणाराच्या स्मरणशक्तीबद्दल विश्वास धरणें कांहींसें कठिणच, अशा स्थितींत तो काल्पनिक समजणें जास्त सयुक्तिक ठरतें. त्या संवादांत टिळक आगरकरांच्या तोंडी घातलेले पुष्कळसे विचार संवादाचा बनावटपणा निदर्शनास आणणारे आहेत. टिळक-आगरकरांमध्यें कालांतरानें झालेल्या मतभेदाची छाया त्यापूर्वींच्या या संवादांत दृष्टीस पडते.

आगरकर टिळकांचा विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं संकल्पिलेल्या शाळेशीं संबंध जोडून या दोघांनीं आपलें लोकोद्धाराचें ध्येय कृतींत उतरविलें. नंतर केसरी–मराठा हीं मराठी इंग्रजी भाषांतील साप्ताहिकें सुरू केलीं. पुढें बर्वे–प्रकरण उद्भवून आगरकर–टिळकांना तुरुंगांत जावें लागलें, इत्यादि कथाभागांतील कांहीं विधानें पहाण्याजोगीं आहेत. शाळा काढली तेव्हां चिपळूणकर हे एकटेच काय ते लौकिकवान् गृहस्थ होते. कदाचित् नामजोशी हे पुण्याच्या नागरिकांना ठाऊक असतील. आगरकर सुरुवातीच्या वर्षीं शाळेंतच नव्हते, यामुळें त्यांच्या लौकिकाचा प्रश्नच उद्भवत नाहीं. टिळकांची स्थिति लौकिकाच्या दृष्टीनें आगरकरासारखीच होती. टिळक हा एक प्रथम वर्गांत परीक्षा उत्तीर्ण होणारा कुशाग्र बुद्धीचा तरुण एवढेंच फार तर थोडयाशा चौकसांच्या कानावर असेल. इकडे दुर्लक्ष करून शाळासंस्थापकांची कीर्ति ( reputation ) व प्रतिष्ठा ( prestige ) अशी होती कीं दूरगांवचे पालक आपल्या शाळकरी मुलांना या नव्या शाळेंत पाठवूं लागले, असें श्री. ताम्हनकरांनीं म्हटलें आहे. चिपळूणकरांची शाळा म्हणून आपण पूर्वीची शाळा सोडून पुण्यास गेलों, अशा पुष्कळांच्या आठवणी उपलब्ध आहेत. पण श्री. ताम्हनकर टिळकचरित्र लिहीत असल्यानें टिळकांना चिपळूणकरांच्या १८८० सालांतील योग्यतेचे भागीदार बनविणें ताम्हनकरांना अवश्य वाटलें.

" टिळक देशसेवेच्या आखाडयांत उतरले तेव्हां वासुदेव बळवंत फडक्यांनीं बंडाचें निशाण उभारलें होतें. " असा शाळा–वृत्तपत्रांच्या प्रकरणांमध्यें मजकूर आहे. यावर श्री. ताम्हनकरांची मखलाशी आहे कीं, हें बंड–टिळक, आगरकर, चिपळूणकर यांच्यासारख्या व्यक्तींच्या हृदयांतील स्वातंत्र्यप्राप्तीच्या खळबळीचें चिन्ह असल्याची खात्री बाळगावी. टिळकांच्या देशसेवेची सुरवात आणि फडक्यांची धामधूम या घटना एका वेळच्या नाहींत; अर्थात् फडक्यांचें बंड हें टिळकादिकांच्या स्वातंत्र्यविषयक हृद्गताचें आविष्करण या समीकरणाला श्री. ताम्हनकरांच्या मनसोक्ताशिवाय दुसरा आधार नाहीं. टिळक सशस्त्र बंडखोरीच्या प्रेरणेनें फडक्यांकडे बंदुकीच्या निशाणबाजीचे पाठ घेण्यासाठीं गेले. ही फडक्यांच्या चरित्रांतली कल्पना टिळकांच्या ज्या उद्गारावर उभारली आहे त्या उद्गाराचा संबंध कालानुसंधान ठेवल्यास दुसरीकडे लागतो. टिळक फडक्यांकडे गेले पण जनतेच्या पाठिंब्याशिवाय असा

प्रयत्न व्यर्थ असल्याचें टिळकांना उमगलें. कारण निष्फळ बंडाळीनें नफ्यापेक्षां तोटाच जास्त होतो, याची जाणीव असण्यासारखें टिळकांचें गाढें इतिहासज्ञान होतें. असें ताम्हनकर म्हणतात. टिळकांच्या इतिहासज्ञानासंबंधाचें विधान टिळक–फडक्यांच्या संयोगाला मारक आहे. चिपळूणकरांनीं फडक्यांच्या बंडाबद्दल जें थोडेसें लिहिलें आहे, त्यावर फडक्यांच्या चरित्रकारानें ताशेरा झाडला आहे. फडक्याचें बंड हें चिपळूणकरांच्या हृदयस्थ स्वातंत्र्याभिलाषाचें बाह्य चिन्ह हा श्री. ताम्हणकरांच्या लेखनचापल्याचा प्रताप असून त्याला आधार सांपडणार नाहीं. कंसाला मारण्यासाठीं जसा कृष्णजन्म तसा राजकीय पारतंत्र्याच्या नायनाटासाठीं टिळकांचा जन्म ही पुराणांतील अवतारचरित्राशीं जुळणारी श्री. ताम्हनकरांची कल्पना या बंडखोरीच्या तात्त्विक विवेचनांत दृष्टीस पडते.

बर्वेप्रकरणाची शिक्षा भोगून टिळक आगरकर आपल्या कामावर रुजू होईपर्यंतच्या हकीकतींत टिळकांना अद्वितीयत्वाच्या स्थानीं श्री. ताम्हनकरांनीं बसविलेलें नाहीं. १८८२ च्या मार्चमध्यें चिपळूणकर निवर्तले, या स्थित्यंतराचा फायदा घेऊन श्री. ताम्हनकरांनीं १८८२ नंतरच्या काळांत शिक्षणक्षेत्रांतील व त्याबाहेरील घडामोडींचें सारें श्रेय टिळकांना देण्याची जणूं काय प्रतिज्ञाच केली आहे. टिळकांना राष्ट्रीय दास्यविमोचनाचा ( national liberation ) संदेश जनतेमध्यें फैलावण्यासाठीं चांगलें शिक्षण झालेले स्वार्थत्यागी तरुण हवे होते म्हणून त्यांना कालेज काढावेसें वाटलें. तीन वर्षांतील कामगिरीनें टिळक व त्यांचे सहकारी यांच्याबद्दल लोकांत विश्वास वाढला होता. 'टिळक व त्यांचे सहकारी' या शब्दांनीं श्री. ताम्हनकरांनीं चिपळूणकरांच्या पश्चात् टिळकांना अग्रगण्यत्वाचा मान दिला आहे. ( Tilak and his fellow workers, Tilak and his coworkers, Tilak and his collegues ) याप्रमाणें श्री. ताम्हनकरांनीं टिळकांच्या जोडीदारांना दुय्यम जागीं बसविलें आहे. मात्र कॉलेजांत गणितशास्त्र शिकविणारे टिळक आपला राष्ट्रीय दास्यविमोचनाचा हेतु विद्यार्थ्यांच्या गळीं केव्हां व कोणत्या युक्तीनें उतरवीत असत, याचें स्पष्टीकरण श्री. ताम्हनकरांच्या विवरणांत नाहीं. विद्यापीठानें नेमलेलीं पुस्तकें शिकवायचीं, त्यांस अनुसरून बोलायचें, या शिक्षणक्रमांत राष्ट्रीय म्हणून वेगळें कांहीं पटवायला अवकाशच नसतां 'टिळक व त्यांच्या सहाध्यापकांनीं आपल्या संस्थेचा उत्तम राष्ट्रीय शिक्षणाची संस्था असा लौकिक वाढविण्याचा सपाट लावला होता.' या वर्णनांत सरकारी वक्रदृष्टीचा मोर्चा आपल्या संस्थेकडे वळल्याचें माहीत असूनहि टिळकांनीं त्याची पर्वा केली नाहीं, अशी माहिती आहे व ताबडतोब पुढें ज्याची वक्रदृष्टि तेंच सरकार आपल्या डेक्कन कॉलेजाची व्यवस्था डे. ए. सोसायटीकडे सोपविण्याला सिद्ध झाल्याचा वृत्तांत आहे. वक्रदृष्टि व अनुकूलता यांचा विरोध उडविण्याचें श्री. ताम्हनकरांचें हें कौशल्य ध्यानांत ठेवणें, त्यांच्या कलमकारागिरीच्या परिचयाला अवश्य आहे.

डे. ए. सोसायटीच्या अग्रणीला आपली संस्था ज्या कारणांसाठीं सोडावी लागली, त्याची हकीकत देण्यापूर्वीं गोखल्यांचा पाय संस्थेमध्यें पडला व टिळकांना आपला पाय तेथून काढावा लागला असं श्री. ताम्हनकरांनीं सूतउवाच करून ठेवलें आहे. ह्यांत टिळक गोखल्यांच्या अंतरंगभेदाबरोबरच एक काळा तर दुसरा गोरा, एक ओबड धोबड राकट रूपाचा तर दुसरा देखणा असा बहिरंगभेदहि दाखविला आहे. टिळकांनीं संस्था सोडतांना दिलेला राजीनामा हा एक वादाचा विषय आहे. टिळक गेल्यानें शिक्षण संस्थांची भरभराटीच्या दृष्टीनें कसलीच हानि झाली नाहीं. वृत्तपत्रें विकत घेऊन टिळकांनीं आपली देशसेवा जास्त व्यापक व स्वतंत्र पद्धतीनें आरंभली-प्रश्न एवढाच कीं, ज्या टिळकांना त्याच्या अधिकृत चरित्र-लेखकानें चिपळूणकरांमागून अग्रगण्यत्वानें सर्वत्र गौरविलें आहे, त्या टिळकांविरुद्ध त्यांच्या सर्व सहकाऱ्यांनीं संस्थेबाहेर कां पडूं द्यावें ? श्री. ताम्हनकरांनीं या प्रश्नाचें उत्तर दिलेलें नाहीं.

टिळकांच्या देशसेवेंत राजकारणाइतकें समाजसुधारणेला महत्त्व नव्हतें. त्यांनीं गणेशोत्सव आणि शिवाजीउत्सव गाजविले, इत्यादि टिळकांच्या कर्तृत्वाचीं अंगें सर्वश्रुत आहेत. श्री. ताम्हनकरांनीं या अंगांचें विवरण संक्षेपानें केलेलें आहे; तथापि हीं अंगें त्यांनीं ज्या मीमांसक विचारसरणीच्या चौकटींत बसविलीं आहेत ती विचारसरणी सारीच्यासारी पटण्याजोगी नाहीं. घटनेच्या माहितीपेक्षां या अत्युक्त विचारसरणीचा पगडा त्यांच्या लेखनावर असल्यानें तें धड चरित्र








नाहीं व धड चरित्राचें भाष्यहि नाहीं. गणेशोत्सव काय किंवा शिवाजीउत्सव काय त्याची ओढ महाराष्ट्रीयांनाच असणार. टिळकांच्या काळीं हिंदुस्थानांतील बहुतेक साऱ्या मोठया शहरांतून थोडयाफार प्रमाणांत महाराष्ट्रीयांची वस्ती होती व पाकिस्तान वगळल्यास आजहि आहे, अशा महाराष्ट्रीयांनीं वरील दोन्ही उत्सव दरवर्षी आपापल्या शहरीं साजरे करण्याचा प्रघात पडला आहे. टिळकांच्या हयातींत जपानच्या राजधानीमध्यें—टोकियोमध्यें हा उत्सव होऊन गेला. पण हे उत्सव करणारे महाराष्ट्रीय होते व असतात. ही वस्तुस्थिति झांकून ठेवून एकदम कराची, कलकत्ता, काशी, मद्रास या शहरांचीं नांवें उत्सवानिमित्त वाचकांपुढें एकत्र सोडून त्याला टिळकांच्या कार्यांनीं देशाचें चारी कोपरे व्यापले असा अभिप्राय जोडला कीं वाचकाला टिळकांचें यश अवाढव्य वाटू लागतें. श्री. ताम्हनकरांनीं अशा चलाखीनें आपली लेखणी चालवून वाचकांच्या बुद्धीवर भ्रमाचा प्रभाव राहील असा यत्न केलेला आहे. टिळकांनीं पुरस्कारलेला गणेशोत्सव हा राष्ट्रीय जागृतीला टिळकांच्या हयातीत कदाचित्, फक्त मोठया शहरांतून उपयोगी पडला असेल, हल्लीं केवळ स्वभावसुलभ उत्सवप्रियतेच्या निरंकुश अवस्थेचा प्रत्यय हा उत्सव आणून देत असतो. शिवाजीउत्सवानें महाराष्ट्राच्या हिंदु समाजांत देशप्रेमाला ऐतिहासिक अधिष्ठान पुरविलें; पण त्या उत्सवानें अखिल भारतीय राष्ट्रीय ऐक्याला हातभार लावला, असें पटवून देणें अवघड आहे.

१८९७ च्या खटल्यानंतर टिळकांच्या पाठीस ताईमहाराज प्रकरण लागलें व तें जवळ जवळ तीन वर्षें चालून १९०४ च्या मार्च महिन्यांत टिळक त्याच्या तडाक्यांतून सहीसलामत सुटले. त्या काळांत टिळकांचीं इतर कामें सुरू होतीं, तथापि १९०५ च्या उत्तरार्धांत कर्झनशाहीनें बंगालची फाळणी अमलांत आणल्यावर जो क्षोभ देशांत माजला त्यानें टिळकांच्या देशभक्तीला गति व धार लाभली. बंगालचें दुःख हें आपलेंच दुःख अशा तन्मयतेनें त्यांनीं बंगालच्या चळवळीचें तुफान महाराष्ट्रांत आणून सोडलें. इतर प्रदेशांतून बंगालच्या क्षोभाची लाट पोचली नव्हती, असें नाहीं. सर्व देशांत वंगभंगासंबंधांतील सरकारच्या बेगुमान शिरजोरीचा संताप पसरला होता. टिळकांनीं महाराष्ट्रांत बंगालच्या आपत्तीची पोटतिडीक उत्पन्न केली परंतु श्री. ताम्हनकरांनीं या चळवळीचें विवरण करीत असतां बंगाली जनतेनें स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्यप्राप्तीचा बौद्धिक वाचिक निदिध्यास असे जे चार उपाय स्वीकारण्याचा निश्चय केला, ते उपाय मुळांत टिळकांचे असें भासविलें आहे. टिळकांनीं वेदान्ताच्या परिभाषेंत या चार उपायांना 'चतुःसूत्री' म्हणून संबोधलें; सुबोध संज्ञा देऊन ह्या चार उपायांचा परिचय व प्रसार टिळकांनीं महाराष्ट्रांत वाढविला, हें कोणीहि नाकबूल करूं शकत नाहीं. मूलतः हे उपाय बंगालच्या क्षुब्ध अंतरंगातून बाहेर पडले. टिळकांनीं आनुषंगिक कर्तव्यासह त्यांचें ज्ञान महाराष्ट्रीय समाजांत खोल रुजविलें. पण 'अ'च्या मुलाला 'ब'नें मनोहर अनुरूप नांव दिल्यास 'ब'ला त्या मुलाचा प्रत्यक्ष जन्मदाता समजावें अशी विचित्र दृष्टि पत्करून श्री. ताम्हनकरांनीं टिळकांच्या गळयांत सदर उपायांचें जनकत्व अडकविलें आहे. टिळकांचा वरील चतुःसूत्री किंवा चतुर्मुखी कार्यक्रम लजपतराय, विपिनचंद्र पाल आणि अरविंद घोस यांना पटून ते टिळकांच्या निशाणाखालीं एकवटले. त्यांनीं टिळकांचा हा चतुर्विध कार्यक्रम मनःपूर्वक स्वीकारला. ( पान १०९ ) याप्रमाणें नव्या चळवळीचें अखिल भारतीय नेतृत्व टिळकांना देऊं केल्यावर बनारसचें ( १९०५ ) व कलकत्त्याचें अधिवेशन टिळकांच्या विचारांनीं भारावून गेलें होतें, असें प्रतिपादन चरित्रकारानें करावें हें क्रमप्राप्तच होतें. टिळकांनीं १९०५ मध्यें काँग्रेसचा अधिवेशन प्रसंग साधून नव्या पक्षाच्या कार्याचा मंत्र आपल्या अनुयायांना पटविला व त्यांस घरोघर पाठवून दिलें. १९०६ सालीं टिळकांनीं या मंत्राची घोषणा कलकत्त्यांस केली. वस्तुतः टिळकांनीं जो मंत्र पढविला त्याचा परिचय कै. शि. म. परांजपे यांच्या 'काळ' पत्रांतून महाराष्ट्रापुरतें बोलायचें तर १९०५ पूर्वीं तीन चार वर्षें करून दिला जात होता. कलकत्त्यास पालबाबूंनीं चालविलेल्या 'न्यू इंडिया' साप्ताहिकांतून त्या मंत्राचा उच्चार कलकत्त्याच्या अधिवेशनापूर्वी कित्येक वर्षें असाच चालू होता. परंतु ते विचार पिकण्याचा काळ बंगालच्या फाळणीनें उत्पन्न केला. ब्रिटिश मालाच्या बहिष्काराला व्यापक रूप देण्याचा प्रयत्न म्हणजे नव्या पक्षाचा

कार्यक्रम. टिळकांकडे त्या कार्यक्रमाच्या महाराष्ट्रांतील पुरस्काराचा मान देण्यांत बिलकुल चूक नाहीं. परंतु टिळक त्या कार्यक्रमाचे उत्पादक नव्हते. बंगालच्या पुढाऱ्यांनीं टिळकांना अगाऊ विचारून आपलें कर्तव्य निश्चित केलें नव्हतें तरीसुद्धां टिळकांना त्या कार्यक्रमाचे उत्पादक ठरवून खरी 'हिंदी जनता' (The people of india ) त्यांनीं अस्तित्वांत आणली, असें सांगण्यापर्यंत श्री. ताम्हनकरांच्या कल्पकतेनें दौड मारली आहे.

टिळकांच्या चळवळीनें 'सरकार भेदरलें किंवा भांबावलें' नेमस्त पक्ष घाबरला, गांगरला अशा अर्थाचीं वाक्यें सरकार व नेमस्त यांना उद्देशून आपल्या लेखनांत ताम्हनकरांनीं किती ठिकाणीं पेरलीं आहेत, याची मोजदाद करणें कठिण आहे व बहुतांशीं तीं वस्तुस्थितीला सोडून असल्याचें मुद्दाम सांगायला नको. नव्या पक्षाचा कार्यक्रम टिळकांच्या हयातीमध्यें प्रत्यक्ष कृतींत कधींच उतरला नव्हता. सरकारनें दडपशाहीचे कायदे राजद्रोही विचारांचा फैलाव थांबविण्यासाठीं जन्मास घातले होते. सरकार टिळकांच्या कर्तृत्वानें भ्यालें असतें तर त्यांच्यावर १९०८ सालीं दुसऱ्यांदा राजद्रोहाच्या आरोपाचा आघात करण्याला ते कचरलें असते. १९०५ पासून वंगभंगाच्या संतापानें बंगाली जनता बिथरली व तिलां दडपण्याचे प्रयोग आधीं बंगालमध्यें सुरू झाले. टिळकांच्या तत्कालीन कामगिरीचें स्वरूप पूर्वी सांगितलेंच आहे. १९०५-०८ या वर्षांत टिळकांची हालचाल विशेष उत्साहाची होती. १९०८ च्या एप्रिल अखेरीस बांबचा स्फोट झाला. त्या स्फोटाची कार्यकारण मीमांसा केसरीनें चालविली तेव्हां सरकारनें टिळकांना पकडून सहा वर्षें कैदेची शिक्षा ठोठावली. त्यापूर्वी सुरतेस काँग्रेसचें अधिवेशन मोडलें. त्या प्रसंगाशीं टिळकांचा संबंध असल्यामुळें साधारणपणें टिळकांच्या चरित्रकारांनीं टिळकांच्या आत्मसमर्थनाला उचलून धरावें, हें स्वाभाविक आहे. श्री. ताम्हनकरांनीं सुरतेच्या हकीकतीमध्यें टिळकांनीं मुळींच चूक केली नाहीं, असें दाखविण्याचा यत्न केला आहे. तो विषय पिंजण्याची आज गरज नाहीं म्हणून १९०८ च्या खटल्याकडे वळणें बरें.

या खटल्याच्या प्रकरणांत सुरवातीला श्री. ताम्हनकरांनीं एक रूपक मांडलें आहे. त्याचा सारांशः— "१८१५ नेपोलियननें इंग्लंड जिंकलें व तेथें राज्यकारभाराची घडी बसविली. शंभर वर्षें हा कारभार निर्विघ्न चालला होता; पुढें विन्स्टन स्पेन्सर चर्चिल या नांवाच्या एका पुरुषानें परक्यांच्या कारभाराविरुद्ध जळजळीत लेख लिहिले आणि स्फूर्तिदायक व्याख्यानें आरंभलीं. पुढें कांहीं कटवाल्यांनीं बॉंब फेकून एकदोन फ्रेंच अधिकारी मारले. बॉंबच्या अत्याचाराची जबाबदारी जुलमी अधिकाऱ्यांची असून बॉंब उडविणाऱ्या तरुणांवर जळफळण्यांत अर्थ नाहीं, असा बॉंबविषयीं एक लेख चर्चिलनें लिहिला. त्या योगानें फ्रेंच राज्यकर्त्यांच्या तळपायाची आग मस्तकास पोंचून त्यांनीं चर्चिलवर खटला भरला. ७ फ्रेंच व २ इंग्रज अशा ज्यूरीपुढें खटल्याची सुनावणी चालू झाली. चर्चिलच्या इंग्रजी भाषेंतील लेखांचे फ्रेंच तर्जुमे चुकीचे आहेत ही तक्रार जज्जानें मनावर घेतली नाहीं. ज्यूरीनें ७ वि. २ याप्रमाणें बहुमताकडे लक्ष देऊन चर्चिल दोषी असल्याचा निकाल दिला. न्यायाधीशानें तो मान्य करून चर्चिलला ६ वर्षांच्या हद्दपारीची शिक्षा ठोठावली."

श्री. ताम्हनकर गंभीरपणें बजावतात कीं हें रूपक विक्षिप्तपणाचें नाहीं. 'चर्चिल ऐवजी टिळक व इंग्रजां ऐवजी हिंदी जनता असा या रूपकाचा गर्भितार्थ आहे.' या रूपकांत न्यायाधीश कोणत्या जातीचा याचें उत्तर नाहीं. टिळकांच्या खटल्यांतील न्यायाधीश हिंदी (पार्शी) होता. रूपकांतली ही उणीव स्पष्ट आहे. श्री. ताम्हनकरांचें हें रूपक भारतीय वाचकाला हास्यास्पद म्हणूनच अनावश्यक वाटेल. आपलें पुस्तक प्रामुख्यानें भारतीयांसाठीं नसून इंग्रजी भाषाभिज्ञ परदेशस्थाकरितां आहे, असें चरित्रकार उत्तर देऊं शकेल. तरी त्या उत्तरानें समाधान व्हावयाचें नाहीं. इंग्रज व आयरिश यांच्या झगड्यांतील आयरिशावरील खटले व निकाल इंग्रजांच्या परिचयाचे असल्यानें हें रूपक इंग्रजांना नवें काय शिकवणार ? इंग्लंडखेरीज इतर देशांतील जनतेला त्यांत स्वारस्य वाटणार नाहीं. या प्रमाणें विचार करूं लागल्यास या रूपकानें पानें वाढविलीं एवढेंच म्हणतां येतें.

१८९७ पेक्षां १९०८ चा खटला जास्त महत्त्वाचा असूनहि 'दिवस पावसाळयाचे असून त्या दिवशीं सूर्य निरभ्र आकाशांत उगवला—' अशा सारखें कवित्व या वेळीं लेखकाच्या हृदयांत उचंबळलें नाहीं,



अनुक्रमणिका








तरी वरील रूपकाच्या द्वारें तें प्रगटलें आहे. १८९७ सालीं ज्यूरीची व्यवस्था १९०८ सारखीच होती, मग याच वेळीं 'इंग्लंडवर फ्रेंचाचें राज्य' ही कल्पना स्वीकारण्याचें कारण काय ? ही कल्पना स्वीकारून टिळकांच्या खटल्याचा तपशील सांगतांना 'ज्या लेखांसाठीं खटला ते लेख टिळकांनीं लिहिले; त्यांत टिळकांचा ठसा ओतप्रोत होता, ( His two articles ... ... were typical of Tilak's approach. He attacked the adversary... ) असें श्री. ताम्हनकरांनीं म्हटलें आहे. ते लेख टिळकांचे नव्हते ही गोष्ट जगजाहीर आहे. पण ताम्हनकरांना ती आठवली नाहीं. टिळकांच्या सिंहगडावरील बंगल्यांत स्फोटक द्रव्यासंबंधाच्या पुस्तकांचीं नांवें असलेलें कार्ड सापडलें ही देखील टिळकांनीं अक्षित लेख लिहिल्यासारखीच बिनबुडाची गोष्ट आहे. तें कार्ड टिळकांच्या पुण्यांतील निवासस्थानीं टेबलाच्या उघड्या खणांत सांपडलें होतें. गडावरील बंगल्याची झडती वारंटावांचून घेण्यांत आली, हें असेंच निराधार विधान आहे. श्री. ताम्हनकरांनीं या खटल्याचा थोडक्यांत गोषवारा दिला आहे.

त्यापुढचें प्रकरण या खटल्यासंबंधाच्या देशी विलायती वृत्तपत्रांतील लेखांच्या उताऱ्यांनीं भरून काढलें आहे. नंतर मंडालेचा तुरुंगवास वर्णिला असून 'वीरांचें पुनरागमन' अशा मथळ्याच्या प्रकरणांत सुटकेचा वृत्तांत आहे. टिळकांची मंडालेहून मेक्टिला येथें रवानगी झाली त्यावेळीं त्यांच्या सोबतीला एक इंग्रज लष्करी अंमलदार होता. त्यानें टिळकांबरोबर बोलणें चालणें करून त्यांचे राजकीय विचार ऐकले व ते विचार ब्रिटिश विरोधी असल्याचा मजकूर सरकारास कळविला. १९११ मध्यें टिळकांना सोडावें असें सरकारच्या वरिष्ठांत घाटत होतें, परंतु मुंबई सरकारनें ती वाटाघाट मोडून काढली. टिळकांनीं सुटकेसाठीं दोनदां अर्ज केले होते; त्यांची नकारानें वासलात लावली गेली आणि नकारामागें त्या लष्करी अंमलदारानें कळविलेला मजकूर होता, ही माहिती ताम्हनकरविरचित तुरुंगवासाच्या प्रकरणांत नाहीं. श्री. ताम्हनकरांनीं प्रसिद्ध झालेलें टिळकांच्या विषयींचें वाङ्मय नीट वाचल्याचा अनुभव येत नाहीं. सरकारी दप्तरांतील कागदपत्रें पाहिलीं हा ताम्हनकरांचा दावा असाच पोकळ आहे. ताम्हनकरांना दिल्लीचें दप्तर पहाण्याची परवानगी तेथील दप्तरदारानें सरकारांतून मिळवून दिली, असें तें प्रस्तावनेंत म्हणतात त्यावरून ताम्हनकरांनीं तेथील कागद पाहिले असें वाचकांनीं मानावें. टिळक मुंबई राज्यांतले, याकरितां मुंबईच्या सरकारी दप्तरांत त्यांनीं प्रवेश करून घ्यायला हवा होता. त्यांनीं मुंबईच्या दप्तरांत डोकावल्याची नोंद नाहीं. टिळकांचें सांगोपांग चरित्र लंडनमधील इंडिया ऑफिसच्या दप्तरांतील साहित्य हातीं आल्याशिवाय लिहिलें जाणार नाहीं असें विधान त्यांच्या प्रस्तावनेंत आहे. आपल्या चरित्रलेखनांतील दोषावर पांघरूण घालण्याकरितां इंडिया ऑफिसच्या दप्तराचा उल्लेख ताम्हनकरांनीं केलेला आहे. ज्यानें उपलब्ध वाङ्मय नीट वाचलें नाहीं, त्यानें इंडिया ऑफिसच्या दप्तरांतील कागद उपलब्ध झाले असते तर त्यांचा योग्य उपयोग केला असता असा विश्वास वाटण्यासारखें ताम्हनकरांचें 'अधिकृत' चरित्र नाहीं.

येथवर केलेल्या विवेचनावरून ताम्हनकरांनीं टिळकचरित्रासंबंधांत जे पूर्वग्रह स्वीकारून आपलें काम बजावलें, त्याचा बोध वाचकांना झाला असेल. जे विचित्र प्रकार मागें दाखविले आहेत तेच पुढेंहि आढळतात. टिळकांनीं होमरूल लीग स्थापन केली त्याप्रमाणें बेझंटबाईंनीं त्याच नांवाची व टिळकांच्या लीगप्रमाणें अखिल भारतीय स्वरूपाची आणि कामगिरीची एक संस्था मद्रासला उभी केली. ताम्हनकर सांगतात कीं, ( पान २३६ ) बेझंटबाई मोठ्या धडाडीच्या व उत्साहाच्या राजकारणी व्यक्ति असल्याचें टिळकांनीं ओळखलें आणि टिळकांच्या ध्येयवादाची आंच बाईंना होमरूल लीग अस्तित्वांत आणण्याला कारणीभूत झाली. बेझंटबाईंच्या राजकारणाचा पूर्वेतिहास पाहिला तर होमरूल लीगसाठीं बाईंना टिळकांच्या प्रेरणेची आवश्यकता होती, असें म्हणणें कठिण आहे. ( ताम्हनकरांना कांहींच कठिण नाहीं ). शिवाय बाईंच्या लीगमध्यें सामील झालेल्या प्रसिद्ध भारतीयांचीं नांवें पाहिल्यास देशामध्यें बाईंच्या संस्थेची प्रतिष्ठा टिळकांच्या संस्थेहून जास्त मानली जात होती याबद्दल शंका नको. टिळकांकडून होमरूलवरील भाषणांनिमित्त ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं जामीन मागितला. बाईंना तर प्रत्यक्ष बंदीवासांतच ठेवलें होतें. बाईंच्या चळवळीचा धडाका








तुफानासारखा होता; निदान बाईंच्या चळवळीपुढें टिळकांची चळवळ थंड वाटत असे. दोघांच्या चळवळी देशहिताच्या होत्या. वर्ष दोन वर्षें दोन्ही व्यक्तींचा एकोपा राहिला. पुढें दोघांचें बिनसलें. बाईंनीं आरंभापासून आपली संस्था वेगळी ठेवली होती आणि पुढें टिळक व बेझंट यांचा बेबनाव उद्भवला या दोन गोष्टी बेझंटबाईंना टिळकांच्या ध्येयवादानें इतकें स्फुरण चढलें कीं त्यांनीं आपली होमरूललीग निर्माण केली. ( So fired by Tilak's idealism that she founded her own Home Rule League ) या विधानाला पुष्टि देणाऱ्या नाहींत.

श्री. ताम्हनकर यांच्या लेखनाचा ढंग निदर्शनास आणतांना ज्या दोषांची वाच्यता केली आहे, ह्या दोषांबद्दल मागें इतरांच्या संदर्भांत म्हटल्याप्रमाणें ते किरकोळ आहेत, अर्थात् क्षम्य आहेत, किंबहुना लक्ष देण्याइतकेसुद्धां महत्त्वाचे नाहींत, त्यायोगानें टिळक-चरित्राची लवमात्र हानि होत नाहीं, असें समर्थन करतां येईल. काव्याच्या छटा शैलीच्या नांवावर खपतील, शिवाय या चरित्रलेखनाचा रोख इंग्रजी भाषेच्या जाणत्या विदेशी वाचकांच्या दिशेनें ठेवला आहे, यामुळें भारतीय त्यांतल्या त्यांत महाराष्ट्रीय वाचकांनीं चरित्रांत उमगणाऱ्या उणीवाबद्दल खळखळण्याची गरज नाहीं, असेंहि श्री. ताम्हनकरांच्या बाजूनें प्रतिपादन केलें जाण्याचा संभव आहे. अशा तऱ्हेची तरफदारी नव्हे सारवासारव ही ‘ अनधिकृत ’ लेखनासंबंधांत देखील शोभणार नाहीं, मग ‘ अधिकृत ’ या संज्ञेच्या लेखनाला ती लाजिरवाणी ठरेल हें स्पष्ट आहे. टिळकांच्या जीवनांतल्या ठळक घटना बिनचूक आहेत मग त्या घटनांचा तपशील कितीहि विकृत अथवा चुकीचा असला तरी चालेल, असें निदान अधिकृताला म्हणतां येणार नाहीं. अधिकृताचें मोल पराकाष्ठेच्या विश्वसनीयतेखेरीज दुसरें कोणतेंच नाहीं आणि त्याचीच ताम्हनकरांच्या लेखनांत वाण आहे. उलट इतर टिळक-चरित्रकारांनीं – विशेषतः ज्यांच्यांत पारितोषिकांची वांटणी झाली त्यांनीं चुका न होऊं देण्याची ताम्हनकरांच्यापेक्षां पुष्कळच अधिक खबरदारी बाळगल्याचा अनुभव येतो. त्यांच्या ठिकाणीं स्वैरता आणि धृष्टता या दोन्ही अवगुणांचा अभाव आहे. जे कै. केळकरांसकट जुन्या नव्या इतर चरित्रकारांना करवलें नाहीं, तें आपण करून दाखवूं, अशी दुराकांक्षा ताम्हनकरांनीं धरली. त्या दुराकांक्षेचे परिणाम अनेक स्थळीं दृष्टीस पडतात. टिळक हे जागतिक महत्त्वाच्या विद्वत्तेचे आणि आशिया खंडाचा उद्धार घडविणाऱ्या कर्तबगारीचे पुरुष होते, असें सिद्ध करण्याचा ताम्हनकरांचा दुराग्रह आपल्या निरर्थकतेनें ठिकठिकाणीं उघडकीस येतो. यांत खेदाची गोष्ट एवढीच कीं, आपलें लेखन विश्वसनीय असल्याचें पटविण्यासाठीं त्यांनीं एकदोन व्यक्तींचीं नांवें नमूद केलेलीं आहेत. आज त्या व्यक्ति दिवंगत झाल्या हें एकप्रकारें ताम्हनकरांच्या फायद्याचें आहे, परंतु ज्यांना त्या व्यक्तींच्या ज्ञानाची माहिती आहे, त्यांना सदर व्यक्तींनीं ताम्हनकरांच्या बऱ्याचशा मजकुराला विरोध केला असला पाहिजे, असें अनुमान करतां येईल.

१९५६ सालीं टिळकजन्मशताब्दीच्या पर्वणींत टिळक-चरित्राचीं अनेक पुस्तकें झालीं. साधारणपणें मनोरंजनपर नसलेल्या विषयांवरील पुस्तकें वाचण्या-संबंधांतील अनुभव ध्यानांत ठेवल्यास या पुस्तकाचें लोकांकडून उत्साहानें स्वागत होण्याची शक्यता नाहीं. विकत घेणारे पुस्तकें बारकाईनें समग्र वाचतील असा प्रकार नसतो. जेथें वाचण्याचीच मारामार तेथें त्यांतील मजकुराच्या खरेखोटेपणाबद्दल शहानिशा होण्याची भीति नको. ही वाचनविषयक लोकस्थिति ताम्हनकरांसारख्या लेखकांच्या दृष्टीनें सोयीची आहे. त्यांत पुनः टिळकांच्या संस्थेनें ‘ अधिकृत ’ असा छाप मारलेला, यामुळें त्या संस्थांचे विश्वस्त तो छाप पुस्तकाच्या योग्यतेबद्दल खात्री करून घेऊनच मारतील; असा युक्तिवाद लोकांकडून केला जाण्याचा भरंवसा श्री. ताम्हनकरांना असल्यास नवल नाहीं. लोकांचें अज्ञान किंवा वाचनविषयक उदासीनता, यांचा फायदा घेऊं पहाणें हें जबाबदार लेखकाच्या नीतीला मानवणारें नाहीं. इतरांच्या चुका झाल्या तरी त्यांनीं टिळकचरित्राचें संशोधन व अध्ययन केलें याविषयीं संदेह वाटत नाहीं. श्री. ताम्हनकरांविषयीं असें म्हणण्याविरुद्ध पुष्कळ अडथळे आहेत.

---








कु. दुर्गा भागवत

# धर्म आणि लोकसाहित्य-अभिचार किंवा जादुटोणा : २ :

## मोहिनी मंत्र

आदिवासींना मदनदेवाची अतिशय भक्ति आहे. लैंगिक व्यवहाराकडे बघण्याची त्यांची दृष्टि अगदीं प्राकृतिक व निकोप आहे. प्रेमाइतकी महत्त्वाची गोष्ट तारुण्यांत दुसरी कुठलीहि नाहीं असें त्यांचें मत असतें, आणि म्हणूनच प्रियजनाच्या प्राप्तीसाठीं कोणतेंहि साहस करण्यास हे लोक प्रवृत्त होतात. दैवी उपाय हा एक प्रभावी उपाय असल्यानें ते मांत्रिकाकडे वारंवार धांव घेतात.

प्रियजनावर मोहिनी घालावयाची असल्यास आपल्या छातीचा मळ काढून तो पाण्यांत कालवून भारून तें पाणी त्या व्यक्तीला पाजायचें. स्त्रीला वश करायचें असल्यास त्याहूनहि सोपें. तिच्या रजःस्नावानें भरलेला चिंधीचा तुकडा घेऊन त्याच्यावर मंत्र घातल्यास ती वश झालीच पाहिजे, असा समज सर्वत्र आहे.[1] मेलेल्या कुमारिकेच्या कवटींत वरचें मोहिनीपेय तयार केलें तर तें अत्यंत प्रभावी होतें, असें सांगतात. मोहिनी मंत्रांतली मुख्य देवता मोहिनी किंवा मोहनी. मोहिनी ही अगदी नीच वर्गातल्या जातीची देवता असून ती क्रूर आहे. नरबलीनेंच तिची तृप्ति होते असें खालच्या तोडग्यांत 'खपरधारीमाता' असा जो उल्लेख आहे त्यावरून वाटतें. मोहिनी ही एकटीच देवता नसून, त्या ओहिनी मोहिनी अशा दोघी बहिणी किंवा अनेक मोहिनी किंवा मोहनी असाव्या असें वाटतें. त्या देवतांच्या गोतावळयांत पुरुष देवहि असावेत. मोहिनीचा संबंध चौसष्ट योगिनींशी असावा असाहि तर्क आहे. शाक्त पंथाचा आविर्भाव मोहिनी मंत्रांत दृग्गोचर होतो.[2]

इस्तिवागी[3] पागावान हो. ओखर नजर मोर पगियामे. ओखर मोर छतियामे. अघवानी अघकंकालिन[4] खपरधारी. ओहनी मोहनी दो बहिनी. सब के नजर मोर पाव तरीक. अडर मोर नजर खपरधारी माता चौसट[5] तुम खडे रहे.

( इस्तिवागी तूं गुह्यभागींच्या केंसानी युक्त आहेस. त्याची नजर माझ्या पायावर, माझ्या छातीवर. कल्याणकारी अघकंकालिन कपालधारी. ओहनी मोहनी दोघी बहिणी. सर्वांची नजर माझ्या पायाकडे आणि माझी नजर कपालधारी मातेकडे. चौसष्ट ( देवी ) तुम्ही समोर उभ्या रहा.

---

१. Elwin, The Baiga, p. 347.

२. मोहिनीचें देवस्थान किंवा प्रतीक मध्यप्रदेशांत नसलें, तरी ती वशीकरणाची अधिष्ठात्री देवता आहे. याची साक्ष सर्वत्र मिळते. मिर्झापूर व मध्यभारतांत मोहिनी ही ग्रामदेवता समजली जाते. (Crooke, Folklore in Northern India I p. 94 ). मुंडा जमातींतहि मोहिनीमंत्रांत तिचें आवाहन केलेलें आढळतें पण तिची गणना ग्रामदेवतांत होत नाही.

३. कुठल्या तरी पुरुषदेवाचें नांव. यासंबंधीं कांहीं माहिती उपलब्ध नाहीं.

४. काली.

५. चौसष्ट योगिनी, चौसष्ट योगिनींचें मंदिर जबलपुराजवळ आहे.

( २ ) आगीनके धागा. पवनके मूनी. इंद्रलोकमें जलनका वासा अधर रहिस.[६] जबपर पूछे जगतके मालिक. तोला मैं देवे नहीं. बाईस गढ तोला देवे बहिनी.[७] बाईस गढ राज ते तीन लोक ठाकुराईनं[८] जगतके मालिक.[९]

( आगीचा धागा, पवनाचा खांब, इंद्रलोकांत जळणारा वासा अधांतरी राहिला. जेव्हां जगाच्या स्वामीनें ( स्वामिनीनें ? ) विचारलें, " तुला मी देत नाहीं बहिणी (?). बावीस गढ तुला देतों. बावीस गढांत तुझें राज्य कर. तीन लोक ठाकुराईनला; जगताचा स्वामी ( जगताची स्वामिनी ? ).

### पुरुषांचे मंत्र

( १ ) अहो सिरी ठाकुरजी तोर अघवानकू मांगता हूं। मैं आध घंटा मांगता हूं, सिरी ठाकुरजी के अघवान। सिरी ठाकुरजी है। अगासुर पाठ है। सोतियाँ[१०] पाठ सुद लगादूं। बरमदेव बरमफाँस[११] फार ओहू गौतरीके सालमें बनाय जाता है। चांद सूरज माता रफरफ चलते हैं। जैसे चारे वढ देवता बैठे हो तुमन जा के हम् कहाथन जाव।

( हे श्री ठाकुरजी, मी तुमचा आशीर्वाद मागतो. तुमची (मदत) मला अर्धा तास हवी आहे. अगासुराचा मंत्र (पाठ) आहे. सोतियाचा मंत्र आहे. त्याच्याकडे मी ध्यान देतों. ब्रह्मदेवाचा ब्रह्मफास गायींच्या गोठयांत बनवलेला आहे. सूर्य चंद्र देवता रफरफ चालतात. जोंवर चार देवता बसल्या आहेत, तोंवर माझ्या सांगण्यावरून वाढत जा, लवकर वाढत जा. )

### पुरुषांचे मंत्र

( १ ) अहो सिरी ठाकुरजी[१२] तोरा अघवानकू मांगता हूं। सिरी ठाकुरजीके अघवान। अगेसुर[१३] पाठ। बगेसुर[१४] पाठ। एलापाठ बेला[१५]। अपेटन पाठ अपेटाके। लानवे झपेटन पाठ झपेटके लानवे। सुतिया पाठ सुद लगाके लानवे छिनोर पाठ चित लगाके लानवे। अहो गोतरी बनकदलीके चारा चरे। गंगाघाट के पानी पिये[१६]। तेर

६. या मंत्राचा सुरवातीचा भाग दुर्बोध असून त्यांत असलेला कथांश अज्ञात आहे. महामारीच्या मंत्रांत हेच शब्द आहेत.

७. ही मोहिनी तर नसेल ?

८. ठाकुराईन ही राणी आहे. पहिल्या गोंड राजाची ती बायको. कदाचित् मोहिनी व ठाकुराईन या एकच असाव्यात.

९. या मंत्राचा शेवटचा भागहि महामारीच्या मंत्रांत आढळतो. मंत्रांत थोडा फरक केला कीं एकच मंत्र अनेक देवतांच्या आवाहनासाठीं उपयोगांत आणला जातो असें यावरून स्पष्ट होतें. लोकगीतांचे चरण भिन्न भिन्न लोकगीतांच्या वर्गांत उद्धृत केलेले आढळून येतात. तसाच हा प्रकार वाटतो.

१०. झोपेचा मंत्र ? निद्रादेवीचा मंत्र ?

११. ब्रह्मगांठ ? कीं फास म्हणजे द्यूतांतील फासा, हा सबंध मंत्र दुर्बोध आहे. ब्रह्मदेवाच्या फांसाची कथा अज्ञात आहे.

१२. पहिला गोंड राजा; बहुधा सूर्यदेवहि असावा.

१३. अग्यासुर आगरियांचा अग्निदेव.

१४. वाघानें मारलेला व देवरूप किंवा पिशाचरूप झालेला पूर्वज.

१५. दुर्बोध. एला हें एकाद्या देवतेचें नांव असावें.

१६. झप झप चालणें. सकाळच्या प्रहरीं वनांत बांधलेला सूर्यदेव बंधनांतून मोकळा होऊन आकाशांत झप झप पावलें टाकूं लागतो, त्यावेळीं त्याचें शासन सर्वत्र मानलें जातें. सूर्याला गायीची उपमा दिली आहे. एलापाठ बेला अपेटन, झपेटन हे शब्द प्रासासाठीं वापरले आहेत.











सालमें तोर बच्छरू बंधे है । बन चार के लै छूटे ।
सूरज माता रफ रफ अरथमाना तोर चलता है ।
जैसे चारो देवता जा के ओखर मुंडा में बैठ जाव ।

( हे श्री ठाकुरजी, मी तुझा आशीर्वाद मागतो. श्री ठाकुरजीचा आशीर्वाद, अगेसुरचा पाठ ( मंत्र), बगेसुरचा पाठ, एलापाठ वेला, झपाटण्याचा पाठ झपाटण्यासाठीं, झोपेचा पाठ जागृतींत फळतो; छिनोरचा म्हणजे प्रेमिकाचा पाठ चित्त लावलें कीं फळतो. हे गायी, वनकदलीचा चारा खा, गंगा-घाटचें पाणी पी. तुझें वासरू तुझ्या सांवलींत बांधलें आहे. हे सूर्यदेवते तुझें शासन मानलें जातें आहे, वनांतून सुटलेली तूं रफ रफ चालते आहेस. हे चार देव तिच्या मस्तकांत बसोत.

## गर्भसंभव आणि गर्भपाताचे मंत्र

गर्भसंभवाचे आणि गर्भपाताचे मंत्र बहुतेक सारखेच आहेत. पुष्कळ ठिकाणीं दोहोंचे पाठहि तेच आहेत. परंतु त्यांचे प्रयोग मात्र उलट रीतीनें होतात. गर्भारपण आणि मुलाचा जन्म हे आनंदाचे प्रसंग आहेत. वैद्यकीय आणि दैवी उपायानीं गर्भाचें रक्षण, सुखरूप बाळंतपण आणि बालसंगोपन करणें याला आदिवासींच्या जगांत मात्र जितकें महत्त्व आहे. तितकें कुठेंच नसेल. उठतां बसतां मंत्र, शकुन, दृष्ट त्यांना प्रतीत होत असतात. आणि तरीहि गर्भपात या लोकांत होतो तितका इतर लोकांत क्वचितच करण्यांत येत असेल. गर्भपात पुढील प्रसंगीं करण्यांत येतो. ( १ ) मूल बेवारशी असेल तर; गर्भसंभव पतीखेरीज ज्या पुरुषांशी संबंध होणें अनिष्ट ( उदाहरणार्थ बाप, भाऊ, मोठा दीर, लहान मेहुणा, सासरा इ. ) त्याच्यापासून, किंवा परजातीच्या पुरुषापासून गर्भसंभव झाला असल्यास विवाहित स्त्रिया गर्भपात करतात. एकाद्या स्त्रीचा संबंध तिच्या जातींतच झाल्यास त्याला शासन गर्भपाताचें नाहीं. ज्याचें मूल असेल तो पुरुष जातीला दंड भरून प्रायश्चित्त घेतो व त्या मुलाचा कबजा घेतो. पतीला वाटल्यास त्या स्त्रीला तो ठेवून घेतो किंवा तिचा त्याग करतो.

( २ ) लग्नापूर्वी झालेली गर्भधारणा लज्जास्पद समजतात. वैधव्यांतहि ती घृणास्पद मानली जाते. परंतु कुमारिकेचा गर्भपात अवश्यमेव करतात तसा विधवेचा करतातच असें नाहीं.

( ३ ) वाममार्गी सुवासिनींना व लैंगिक उपभोगांची अनावर आसक्ति असते अशा स्त्रियांना गर्भारपणानें कामतृप्तींत येणारा अडथळा नको असतो आणि म्हणून त्या मांत्रिकाकडे व वैदूकडे धांव घेतात.

( ४ ) चेटूक व मंत्राच्या साहाय्यानें ज्या स्त्रीला मातृत्व लेण्यासारखें वाटत असतें. तिच्या त्या आभरणाची हानी करायची, हा चवथा प्रकार.

## गर्भपाताचे मंत्र

( १ ) अहो भाई हिंगलाजनी[१७] । हिंगलाज फूरि-कते तई बेठे जनम हो गई । राजा लोहगंडी जनम

---

१७. हिंगलाजनी ही देवता भात्यांत रहाणारी आहे. आगरिया लोक भात्याला हिंगलाज म्हणतात. या देवीला हिंगलाज माता असेंहि स्थानपरत्वें म्हणतात. कुणी असें म्हणतात कीं ती सुपाची देवता आहे. ( म्हणजे शेतीशीं संबंध असलेली देवता आहे. ) हिंगलाजनीची किंवा हिंगलाजचीकथा रेवा संस्थानांतली अशी आहे कीं, ती सातबहिणीं पैकीं सर्वांत लहान व सर्वांत सुंदर होती. पिरी देशाई ही सर्वांत वडील. पिरी देशाईचें लग्न माधोगढच्या मुर्रादेवाशीं झालें. मुर्रादेवाचें मन हिंगलाजनीच्या रूपानें बेहोष झालें, त्यानें तिच्याबरोबर संभोग केला. हें इतर बहिणींकडून कळतांच पिरी देशाई संतप्त झाली आणि तिनें परशु घेऊन मुर्रादेवाच्या सर्व सैनिकांचीं मुंडकीं छाटलीं. नंतर या बहिणी जगभर हिंडूं लागल्या आणि रोगराई पसरवूं लागल्या. त्यांच्यापासूनच 'रोगाच्या एकवीस बहिणींची' उत्पत्ति पिरी देशाईनें केली, आणि

हो गई। छिनामें बालक छिनामें बुदा कंचकुवर। काखर संग खेलूं मे। ओला जाने छिता जानकी माता[१८]। अहो परमेसरके भाई लछमनजी। हिंगलाजनीके बेटा ओखर संग- जब घरती तौमें नही देखौ। गुस्सा हो गये लछमनजी। अखरा खे गुरू बैताल। सात समुंदरमे फेंक दिया। युध होगये। प्रानघाती बास चिर के एक फरदा सात समुंद्रमे फेंक दिया। एक फरदा माईके सिंगासन में। बडे फतर बहिनी अंगना बटोरे बेटी बिदासिन भय्या के घर अंगनमे पडे है। क्या चरित हो गये प्रिथीलोकमें। नऊ मण खप्परा साज के खडा हुइस। एकेक खप्परमें बारा गाडा अकाडी के झोका दइस। जैसे के बेटा खडा हो गये। दाई तइ कहा जाथस। गती के वास्ते लछमनसे जीत-करे मै। दूसरे जनममें राजा मरादेव राजा मरा-देवका बेटा करिया कुंवार। समुंद दफोरे हो। धरती दिलेरो। गरभ दिलेरो (हे भात्याची देवी हिंगलाजनी, जेव्हां तूं भाता फुंकलास तेव्हां राजा लोहगंडी जन्मास आला. हा कंचनकुवर क्षणांत लहान मूल तर क्षणांत म्हातारा. (तो विचारतो) मी कुणाजवळ राहूं? कुणाजवळ खेळूं? सीता माता जानकी त्याला ओळखते. हे लक्ष्मणजी, परमेश्वराच्या भावा, हा हिंगलाजनीचा पुत्र जेव्हां पृथ्वी त्याच्यांशी स्नेहभाव बाळगून नव्हती, तेव्हां लक्ष्मणजीला घुस्सा आला. वेताळ, लोहगंडीचा गुरु सात समुद्रांत फेंकला गेला. युद्ध जुंपलें. एक बांस कापला गेला. एक पात (हिंगलाजनी) मातेच्या सिंहासनावर पडली. मोठ्या शिळया बहिणीच्या[१९] आंगणांत पडल्या; कन्या बिदासिन हिच्या व इतर नातेवाइकांच्या अंगणांत पडल्या, आणि भावाच्या पण. पृथ्वीवर काय झालें? नऊ मजली साजाचें घर उभें राहिलें. एका मजल्यावर नऊ गाड्या भरून लाकडें ठेवलीं. मुलगा तसाच उभा राहिला. 'आई तूं कुठें जातेस?' 'मी फिरायला जातें.' 'मी लक्ष्मणावर मात करतो. आई पहिल्या जन्मीं माझें नांव लोहगंडी, दुसऱ्या जन्मीं करिया-कुंवर तिसऱ्या जन्मीं बिठिलवाकुंवर ठेव. राजा नर-देवाचा मुलगा करियाकुंवर. समुद्र खवळो. पृथ्वी कांपो. गर्भ हलो.)

---

त्या देवतांना तिनें जगभर हिंडायला सांगितलें (Elwin, The Baiga pp. 363–65). हिंगलाजचें मात्र पुढें काय झालें तें या कथेंत सांगितलेलें नाहीं. या मंत्रांत ती पुढली हकीगत आली आहे असें मला वाटतें. हिंगलाजनीनें लोहगंडी राजाला (आगरियांच्या पहिल्या राजाला) जन्म दिला. लछमन लोहगंडी-चा शत्रु दिसतो. लोहगंडी हा वेताळाचा शिष्य. त्याचें नांव कंचनकुंवर लोहगंडी असन तो क्षणोक्षणीं रूपें स्वेच्छेप्रमाणें बदली.

हिंगलाजची पूजा सिंध व मुंबई प्रांतांतहि होते (Euthoven, Folklore of Bombay, p. 175) पण या देवतेसंबंधीं अधिक माहिती मिळत नाहीं. हिंगलाजच्या यात्रेच्या वर्णनांतहि हाच प्रकार आढळतो.

१८. सीता व हिंगलाज यांचा संबंध या मंत्रांत आढळून येतो. सीता ही धरित्रीची कन्या; हिंग-लाज ही धरित्री देवताच आहे. हिंगलाज, उमा व सीता यांचें एकीकरण हा भारतीय देवतासंप्रदायांतला एक अजून संशोधन न झालेला विषय आहे. सीतेबद्दल मध्यप्रदेशांत गोंडांत ज्या कथा उपलब्ध आहेत त्यांत सीता लक्ष्मणाच्या मागें जाते व तो तिचा निषेध करतो असें दाखविलें आहे.

१९. ही बहीण कोण तें सांगतां येणार नाहीं. हिंगलाजचीच बहीण असावी.

(२) अहो राजा बिजेरा[२०] के बेटा भैंसासुर। भैंसासुर के बेटा कोयलासुर। कोयलासुर के बेटा अग्यासुर। अग्यासुर के बेटा अरनदानो। अरंदानो के बेटा जरंदानो। बारा खेत खाय। बारा तलाव के पानी पिये। मै अंग्री बलातो। तेला खावे। तोर पेट भर जाही। करे करुहा। भवर माता भवरमाला के ढाले ढाल। ढाला के परगे ढपका उडमारुन खड जाय। अब खंडमारू पताल जाय पहूंचे। करुहा बिरा के दोहाई जा। बैरी के छाती कुंड के खावे। तोर वाटा तै खावे। मोर गुरूके वाटा आवो साथ अघई पंजारी मोर खटकावे। तोला जान लेनू में।

(राजा बिजराचा मुलगा भैंसासुर, भैंसासुराचा मुलगा कोयलासुर, कोयलासुराचा मुलगा अग्यासुर, अग्यासुराचा मुलगा अरंदानो, अरंदानोचा मुलगा जरंदानो, तो बारा शेतें खातो, बारा धान्याचीं कोठारें खातो, बारा तलावांचें पाणी पितो. (हे जरंदानो) मी बोट दाखवीन तेव्हां (तो गर्भ) तूं खा. तुझ पोट भरेल. मी काय करीन ? भुंग्यांची माळा, त्या माळेचें मधलें पदक (गर्भ) गळून पडल आहे. त्या पदकाचे तुकडे उडताहेत. आतां मी तरवारीनें प्रहार करतो तो पाताळांत पोचेल. आंतल्या करुहा वीराला (गर्भाला) घुसळ. या स्त्रीच्या छातीच्या कुंडात शिरून खा. तुझा वांटा तूं खा. माझ्या गुरूचा वांटा साठ आणि अडीच पिंजरे असून, तो मला धमकावतो आहे, आज्ञा करतो आहे. मी तुला पुरतें जाणतों)

**गर्भापातानंतरचे गर्भाशय निरोगी व्हावा—म्हणून उपयोगांत आणलेला मंत्र:**

राजा मरादेव। मरादेवके बेटा संवरामरादेव। संवरामरादेवके बेटा मरादैत। बेटा सोमकुंवारा।

२०. बिजरा किंवा बिजरबद्दल कांहीं माहिती उपलब्ध नाहीं. भैंसासुर म्हणजे म्हसोबा, किंवा कुणाच्या मतें भस्मासुर. म्हसोबा हा सात आसरांचा भाऊ असें समजतात. बाकीच्या साऱ्या आगरियांच्या देवता आहेत.

हे तोडगे करतांना सहानुभवी अभिचाराचा पण अवलंब करतात. यांत वैद्यकीय उपायांचा समावेश होतो. उदाहरणार्थ, गर्भपात गर्भवतीच्या संमतीनें करायचा असल्यास निवडुंगाचा चीक नारळाच्या गाभ्यांत भरून तो नारळ शेणींत भाजायचा. गर्भवतीनें तो नारळ विड्याच्या पानांबरोबर खायचा. गर्भवतीला न समजतां गर्भपात करायचा झाल्यास पुरुषाचें वीर्य विड्याच्या पानांत घालून तो विडा तिला खायला द्यायचा. यांत कल्पना अशी कीं स्त्रीच्या उदरांत अगोदरच एक बीज असतें, तिथें हें दुसरें बीज गेल्यास पहिलें बीज साहजिकच बाहेर पडतें. निवडुंगाला छत्तीसगढीत फुंदर म्हणतात. ग्राम्यभाषेंत स्त्रीच्या जननेंद्रियाला तेंच नांव आहे. शाब्दिक साम्य देखील अशा तऱ्हेनें जादूंत कामीं येतें, निवडुंगाच्या चिकाचें व वीर्याच्या रंगाचेंहि साम्य अभिप्रेत आहे. या उपायानीं स्त्रीला अपाय झाला तर साबूदाण्यांत काळ मिरी घालून खीर करून देतात. आंत तूप व साखर घालतात असें द्रुग जिल्ह्यांत मला समजलें. त्याचप्रमाणें त्या जिल्ह्यांतले गर्भपाताचे दुसरे उपाय असे : (१) दारूंत बंदुकीची दारू घालून प्यायची, दिवसांतून तीन वेळां; (२) मोहाच्या फुलांचा काढा पेलाभर दिवसांतून तीन वेळां प्यायचा; (३) गर्भाशयांत घराच्या छपरावर ठेवलेली एरंडाची काडी घालायची आणि पानांचा व बियांचा काढा प्यायचा.

मंडला व बिलासपुरांत एखाद्या स्त्रीचा गर्भपात करायचा असल्यास जिवंत खेकडी तिच्या उंबऱ्यांत पुरतात व तिच्यावर नाचतात.

द्रुग जिल्ह्यांत एखाद्या स्त्रीचा विटाळ बंद करायचा झाल्यास 'अमरवेली'चा काढा देतात. विटाळ सुरू करण्यासाठीं 'राजगेंदी' व पिवळया धोंतऱ्याची फुलें खायला देतात.








बेटी सोमकुंवारी । गरभ हिलोरे । धरती हिलोरे । समुंद मताय । सोरा बिहाती तोर तुम छोड देना । ए कुख किश्ना भगवान तुझ जनम लेहो ।[२१]

( राजा मरादेव, त्याचा पुत्र संवरामरादेव, संवरामरादेवचा पुत्र मरादैत, मरादैताचा पुत्र सोमकुंवारा, मुलगी सोमकुंवारी, गर्भ हलो, पृथ्वी हलो, गर्भ पडो, समुद्र खवळो, हे सोळा नवरे तूं सोड ( हें बहुधा सोमकुमारीलाच उद्देशून म्हटलेलें दिसतें आहे. पण कथासंदर्भ कांहींच कळत नाहीं. कृष्ण भगवान या कुशींत जन्म घेवो. )

हाच मंत्र गर्भपात होत असल्यास तो टळण्यासाठींहि वापरतात. लाक्षणिक रीत्या गर्भ पडो असें म्हणायचें व सोमकुंवारीची तृप्ति करायची. पण मागाहून कृष्णाचें आवाहन करून तिचें उच्चाटन करायचें, असा अर्थ त्यांत अभिप्रेत आहे. गर्भपाताचे मंत्र उलटे म्हटल्यासहि गर्भरक्षण होतें.

घातपाती कृत्यांसाठीं असुरांची व दैत्यांची संभावना तर कल्याणकारी कृत्यांसाठीं पौराणिक देवतांची संभावना करतात. उदाहरणार्थ :—

### कठीण बाळंतपणांतला मंत्र

राजा दशरथ । माई कौसल्या । राजा पांडव । माई कोतमा । सिरी परमेसुर । छिता जानकी माता । सिरी परमेसुर । माई रुक्मिनी । तुम खडे हो । महादेव पारवती जिवा के पारनेवाला संचाके धारनेवाला तैं हस । ए कैसे होथे । घाटके घटोई दरोजा छोडो । पांच देव खडा है । गो गोहार होवथ है । गोहत्या है । परमेसरजी झट पैदा करो । हनुमानजी तमे इहा नही खडे रहो । तो जैसे रामचंदके कारासु धरे ओखर कूराज ना सुधारवे लो आपन दाई के दूधनला जावे तो ।[२२]

( राजा दशरथ, माई कौसल्या, राजा पांडव, माई कोतमा, श्री परमेश्वर, माई जानकी, श्री परमेश्वर, माई रुक्मिणी, महादेव पार्वती, तुम्ही इथे उभे रहा. तुम्ही रक्षण कर्ते. तुम्ही दैवाचे, संचिताचे व संकटाचे धनी. हें कसें होतें आहे ? हे घाटावरच्या घाटवळा दूर हो. दरवाजा सोड. पांच देव उभे आहेत. गाय बाळंत होत आहे. गोहत्या होत आहे. परमेश्वरजी लवकर सुटका करा. हनुमानजी तुम्ही इथे उभे राहूं नका. रामचंद्रांना मातीचें भांडें हातीं धरून बसावें लागेल, त्यांचें कार्य सिद्धीस गेलें नाहीं तर, तेव्हां तुम्ही जा व आपल्या मातेचा स्तन हातीं घेऊन बसा. )

( २ ) दुसरा तोडगा दुर्ग जिल्ह्यांतले धुर गोंड नांवाच्या गोंदणाऱ्यांकडून मिळाला. या तोडग्याची भाषा गोंडी व छत्तीसगढी मिश्रित आहे. हा तोडगा पद्यमय आहे.

---

२१. या मंत्रावरून असें दिसून येतें कीं तापदायक दैवतें असुरकुळांतलीं. भलें करायला, राम कृष्ण वगैरेंचीं नांवें घेतात. मागच्या मंत्रांत लक्ष्मण गर्भसंरक्षक व दैत्य त्याचा प्रतिस्पर्धी असेंच दाखवलें आहे.

२२. गाय व स्त्री एकरूप आहेत ही पुराणांतली आवडती कल्पना आहे. हनुमान हा ब्रह्मचारी, त्यानें बाळंतपणाच्या प्रसंगीं हजर राहूं नये, नाहीं तर बाळंतीण अडते असा समज आहे. ज्या स्त्रीशीं त्याचा संबंध ती त्याची आई व तो संबंध तिचें दूध पिण्यापुरताच. तिच्या स्तनावर हात फिरवला कीं तिला पान्हा फुटून द्रव येतो व दुसऱ्या मातेच्या यातना ती दूर करते असा समज आहे.

मातीच्या भांड्याचा संबंध असा कीं बाळंतपण कठीण असलें कीं गुणिया वरील मंत्र म्हणत मडक्यांतून विहिरींतलें पाणी काढतो. अनेक पुरुष रांगेत उभे रहातात. एकाच्या हातून दुसऱ्याच्या असें तें मडकें विहिरीपासून बाळंतिणीच्या खोलीपर्यंत पोंचवलें जातें. हे पुरुष स्त्रीच्या सासरच्या गोतवळ्यांतले असतात. नवरा, सासरा, दीर वगैरे. गुणिया तें पाणी तिला पाजतो व बाकीचें तिच्या अंगावर शिंपतो.

गेंद गेंद गेंदला करे
छिम छिम चिपेल करे
चल वेलंगा बीराके बलसे
भगवान पारवती वाता चही
जलदी खुलासा आता चनी
सबदा जीव आराम चही[२३]

( सर्वांच्या मनांत संशय आहे. गर्भवती वेशुद्ध पडली आहे. भारलेल्या पाण्याच्या भांडया ये, वीराचें बल घेऊन ये. महादेव व पार्वती जरूर येतील. मग हवें तें लवकर घडून येईल. सर्वांच्या जीवाला मग आराम मिळेल. )

### रोगनिवारक मंत्र

रोगनिवारक तोडगे असंख्य आहेत. त्याप्रमाणें रोगदेवतांची संख्याहि बेसुमार आहे. प्रांताप्रांतांत, जिल्ह्याजिल्ह्यांत, खेड्याखेडयांत, नदीनाले, विहिरी डोंगर, झाडें झुडपें विविध तामसी देवतांनीं भरलेलीं आहेत. देवतांचा अभ्यास हा सर्वस्वी स्थानिक परंपरेवर आधारलेला आहे. मध्यप्रांतांतल्या रोगदेवतांचा अभ्यास करतांना या देवतांसंबंधीं जी माहिती मला उपलब्ध झाली तिचा सारांश असा:—

आदिवासी, शेतकरी वगैरे लोकांची ठाम समजूत अशी असते कीं रोग कुठलाहि असो त्याचें मूळ देवतांच्या अवकृपेंत, चेटकांत किंवा पूर्वजांच्या कोपांत असतें. कोणत्या कारणानें रोग उत्पन्न झाला आहे याचें निदान गुणिया करतो, आणि चेटूक असल्यास तें उलटविणें, कुलदेवता किंवा स्थानिक देवता कोपली असल्यास तिची शांति करणें, पितरांचा रोष असल्यास त्यांची तृप्ति करणें हीं सारीं कामें मंत्रांच्या साहाय्यानें तो करतो.

रोगदेवता दोन प्रकारच्या असतात. भूदेवता व जलदेवता.

धरतीमाता आणि तिच्याशी संबंध असलेल्या साऱ्या देवता या भूदेवता होत. पृथ्वी मृतांना पोटांत घेते त्यामुळें तिच्यामध्यें एक विशेष मायिक शक्ति वसत असते, ही शक्ति विनाशक असून ती केव्हां जागृत होईल याचा नियम नसतो,[२४] या स्फोटक तामसी शक्तीची अगदीं लहानशी चुणुक म्हणजेच आजार. गोंडांच्या एका उत्पत्तिकथेंत एकवीस प्रकारची माती दिली आहे. या मातीला एकवीस मातीच्या किंवा भूदेवता असें म्हटलें आहे. त्यांचीं नांवें अशीं : (१) सफेत धरती (२) काळी धरती (३) पिवळी धरती[२५] (४) मुडमैली म्हणजे लाल धरती[२६] (५) तपकिरी धरती ( जिच्यांत कांहींहि कधींच पेरलेलें नाहीं अशी जमीन ). ( ७ ) डोम धरती ( हिच्यामुळ कपडे मळतात आणि ते कधींच साफ होत नाहींत). (८) डमार धरती ( ही जमीन रोगराई विशेष उत्पन्न करते ). (९) छुट्टल धरती किंवा रजस्वला धरती ( हिच्यांत

---

२३. बाळंतपण सोपें जावें म्हणून हे लोक आणखीहि एक दैवी उपाय करतात. तो असा: ' तिरिया ' नांवाच्या झाडाच्या वाळलेल्या शेंगा पाण्यांत टाकायच्या; कीं त्या आपोआप अबोलीच्या शेंगाप्रमाणें तडतडून उलतात. त्या शेंगाप्रमाणेंच गर्भाशय उघडेल व बालक बियांप्रमाणें बाहेर पडेल ही कल्पना. यांतहि ' तिरिया ' शब्दाचा श्लेष लक्षांत घेण्याजोगा आहे. ' तिरिया ' म्हणजे ' स्त्री ' असाहि अर्थ अशुद्ध हिंदींत होतो. शाब्दिक साम्यावर कृतीचें मंत्रसामर्थ्य अवलंबून असतें हा जादुविद्येंतला नियम ध्यानांत घेतल्यास, प्रादेशिकतेला लोकसाहित्यांत किती महत्त्व आहे हें सहज लक्षांत येतें. प्रांताप्रांतांतल्या कृति भिन्न असतात.

२४. Origson, **The Maria Gonds of Bastar** p. 240

२५. या मातीनें कावीळ होते.

२६. गोंड स्त्रिया चवथ्या दिवशीं नहातांना लाल मातीनें डोकें धुवावें असें म्हणतात.








कांहींच उगवत नाहीं). (१०) धर्मी धरती (मंगल करणारी जमीन), (११) पापी धरती (सर्वदा अमंगल करणारी), (१२) दुधिया धरती (जिच्यांत पाणी व माती दुधासारखीं शुभ्र आहेत अशी). (१३) बिजफुइटवन धरती (जिच्यांतून बीजांना अंकुर फुटतात अशी), (१४) बनसबोरन धरती (जिथें उगवलेलें सर्व मरतें अशी जमीन) (१५) मुआर धरती (जिथें माणूस मुका होतो अशी जमीन), (१६) पठरलू धरती (खडकाळ जमीन), (१७) भूलन धरती (माणसाचा रस्ता चुकवणारी जमीन), (१८) चमकन धरती (जिथें माणसाला हींव भरून तो कांपू लागतो अशी जमीन), (१९) चक्का धरती (ज्या जमिनींत माणूस भांडतो अशी, (२०) उदनी धरती (जिथें माणसाला विसांवा मिळत नाही अशी जमीन), (२१) पर्रा धरती (जिथें कोणीच जाऊं शकत नाही अशी जमीन). या देवतांना 'बहिणी' म्हणण्याची प्रथा आहे. एकवीस धरती बहिणी, त्याचप्रमाणें वरील कथेंत एकवीस लोहाबहिणी म्हणजे लोखंडाच्या किंवा धातूच्या एकवीस तऱ्हा किंवा देवता, एकवीस धान्य बहिणी किंवा धान्यांच्या तऱ्हा, किंवा देवताहि सांगितलेल्या आहेत. हीं बीजें व एकवीस जीवजंतूंचीं बीजें महादेवानें समुद्रतळींच्या मातीच्या चिमटींत मिसळून निधनगुरूच्या साहाय्यानें मंत्रून त्याची पृथ्वी वृक्षवनस्पती व जीवजंतुंसकट उत्पन्न केली. अर्थात् पृथ्वीचा उगम व अंत दोन्ही मंत्रसामर्थ्यांतच आहे. वर उल्लेखिलेल्या एकवीस प्रकारच्या जमिनीच्या वर्णनांत पृथ्वीच्या पोषक व विनाशक अशा दोन्ही शक्तींचें विवरण केलेलें आहे. पृथ्वीच देते, तीच काढून घेते, तीच पोसते, तीच मारते. पृथ्वीमातेचीं प्रतीकें म्हणजेच अनंत अशा लौकिक ग्रामदेवता. या साऱ्या देवतांत 'सात बहिणीं'ची प्रतिष्ठा सर्वांत मोठी आहे. या सात बहिणींची प्रतिष्ठा भारतभर या ना त्या रूपानें होत असते. या रोगकारिणी देवता म्हणून प्रसिद्ध आहेत.

गोंडांच्यां उत्पत्तिकथेंत, सात समुंदरिया म्हणजे सात अप्सरा, दौगनगुरूच्या, देवांच्या गुरूच्या कन्या होत्या. त्या दौगनगुरूच्या हातांतल्या फोडापासून निघाल्या. दौगनगुरूचें त्यांच्यावर फार प्रेम. सतत आपल्या मांडीवर त्यांना तो बसवी. चंद्र सूर्यालाहि दिसणार नाहींत अशा ठिकाणीं त्यांना तो ठेवी. पण एकदां पवनदेवाची वाट चुकली आणि त्यानें त्या अप्सरांना नांचतांना पाहिलें. तो मोहित झाला, त्याहि त्याच्यावर भुलल्या. दौगनगुरूला राग आला, त्यानें त्याला हांकलून दिलें. मुलींना कोंडून ठेवलें पण अखेर पवनदेवानें महादेवाला आणि दौगनगुरूनें हांकलून दिलेल्या त्याच्या मुलांना वश करून घेतलें आणि दौगनगुरू बाहेर गेला असतां त्याच्या मुलींना या साऱ्यांनीं मोकळें केलें व त्यांचें पवनदेवाशीं लग्न लावलें. दुसऱ्या एका कथेंत याच समुद्रकन्यांना महादेवानें एका कोठडींत बंद करून ठेवलें होतें. पार्वतीला सहा कोठड्या उघडून पहा, सातवी पाहूं नको असें सांगितलें होतें तरी महादेव बाहेर गेल्यावर तिनें स्त्रीसुलभ जिज्ञासेनें ती कोठडी उघडली. त्या समुद्रीअप्सरा तिच्या उदरांत शिरल्या. त्यामुळें पार्वतीला रजःस्राव, गर्भधारणा व बाळंतपण यांचे क्लेश सहन करावे लागले. त्याच्यामुळेंच स्त्रियांना अजूनहि हे क्लेश भोगावे लागतात असा समज आहे.

वऱ्हाडांतहि सात आसरा, या फार तामसी असून त्या पाण्याशीं संबंध असणारे रोग उत्पन्न करतात असा समज आहे.[२७]

२७. Amraoti District Gazetteer p. 118.; *Buldhuna District Gazetteer* pp. 110 ff.








ते रोग म्हणजे मूत्ररोग, गर्भाशयाचे रोग, जलोदर, छातीचे रोग, संधिवात, ताप, डोळे येणें, पू होणें, संग्रहणी, देवी इत्यादि.

बस्तरमध्यें सात जोगिनी किंवा योगिनींना सात बहिणी म्हणतात.

दुर्ग जिल्ह्यांतल्या गोंडांत सातबहिणींपैकीं सिंगारमाता, हेलाडबाई ही सर्वांत सुंदर व लहान असल्याचा उल्लेख वर आलाच आहे. या देवीसंबंधीं पुढें दिलेलें गोंडी गीत महत्त्वाचें आहे :

नालुम कोटुल भूमी हो
पोरन पारन दीपो
सिंगलमन दीपो
अड्डी खाळचे दीपो
अदु बादु ओझे हो
पोर गढता ओझे हो
बारङ् विचार किसोरीं
हिलाड बरिया बुटी
थेलका हापु हुर्जा
कोका नीयु काजल
पोरो दीपना ओझे
कारी पिवरी नूल
बापडे इंगा रैंदळू
नुलदे इंगा रैंदू
तळ्ळत बरिया तोरचुंदु उंगा
सिंगलमल्लु दीपु रैंदु
बगा हंजी उदिन्
चटन कल्कु आदि
नाट इंगा हांदु
गोंदना गोदना इंदु
केने ओझे आये
जनम गोदना कोटन्दु
इदा इसे ओझे

( चार द्वीपांची पृथ्वी. वरतीं परलोक. मध्यें सिंगलदीप ( ही पृथ्वी ) आणि खालचा एक लोक. ही कोण ओझनिन, गोंदणारी ? ही वरच्या लोकांतील ओझनिन आहे. तिचा काय विचार आहे ? हिलाडची ( हिलाड बाईची ) बासांची टोपली आहे. थेलकाच्या बाभळींच्या झाडाच्या कांट्याची तीची सुई आहे. बिब्याच्या तेलाचें काजळ आहे. अशी ही परलोकांतली गोंदणारीण आहे. ही कशाला धरून उतरते ? काळें पिवळें सूत असतें त्याला धरून ती ( पृथ्वीवर ) उतरते. ती डोकीवर टोंपली धरून उतरते आहे. सिंगलदीपावर ( सिंहलद्वीपावर ) उतरते. ती कुठें जाऊन बसते ? ती सपाट खडकावर बसते. ती गांवांत वस्तीच्या ठिकाणीं घुसते. ' गोंदा गोंदा ' म्हणून पुकारते. अशी ही जबरदस्त ओझनिन जन्मभर टिकेल असें गोंदणें गोंदते. अशी ही भारी गोंदणारी आहे.[२८] )

---

२८. हें गाणें देवीसंबंधीं आहे. गोंदण्यापासून इडापिडा टळते. गोंदणें हा एक धार्मिक विधिच असल्यामुळें अस्सल गोंदणाऱ्या गाणें म्हणत म्हणत गोंदतात. भारतभर या गोंदणाऱ्या वैदु स्त्रिया भटकत असतात; त्यांचीं ही गाणीं त्यामुळें अधिकच महत्त्वाचीं आहेत. गोंदण्याबद्दलची भारतीयांची भूमिका या गीतांमुळें स्पष्ट होते. हीं गाणीं परिशिष्टांत दिलीं आहेत.

श्री. वा. सी. बेंद्रे

# *संभाजीचरित्र, जुनें व नवें

## उपसंहार

छत्रपति संभाजी महाराज व त्यांची राजकार्यधुरंदर " सखि राज्ञि " येसुबाईसाहेब यांच्या अनेकविध व महत्त्वपूर्ण हालचालींची संपूर्ण माहिती मिळालेली नाहीं. जीं कांहीं थोडींबहुत कागदपत्रें उपलब्ध झालीं आहेत त्यांच्या साहाय्यानें सतराव्या शतकांतील महाराष्ट्रीय हिंदवी स्वराज्याच्या या अत्यंत आणीबाणीच्या कारकीर्दीतील महत्त्वपूर्ण कार्यकर्तृत्वाची व उच्च संस्कृतीची फक्त रूपरेषाच मिळत आहे. ही रूपरेषा तत्कालीन राजकीय, सामाजिक व धार्मिक परिस्थितीचा संपूर्णतः बोध करून देण्यास फारच अपुरी आहे. तरीहि ती संभाजी महाराजांच्या चरित्राचें सांप्रत रूढ झालेलें स्वरूप समाजाच्या दृष्टींतून दूर करण्यास पूर्ण समर्थ आहे यांत शंका नाहीं. सावत्रमातृहत्येचें हिडिस वर्णन जसें पूर्णपणें काल्पनिक होतें तसाच राजाच्या अकर्तृत्वानें राज्याचा नाश झाला हा आरोपहि दुष्टाव्यानें केलेला अपप्रचार होता हें अगदीं तत्कालीन अव्वल पुरावा आवर्जून सांगत आहे. " सत्तामदाच्या धुंदी " ला भावनेच्या भरांत " मद्याच्या कैफा " चा वेष देऊन, मूळ प्रवादांतील स्वभावधर्माच्या ज्ञानाभावीं, केलेली ही या कथाख्यानाची उभारणी, तत्कालीन परिस्थितीच्या या अल्पहि वास्तवतेच्या बोधानें, संपूर्णतः तर्कटच असल्याची साक्ष पटत आहे. कैद व मृत्यूच्या प्रसंगाशीं बेगमचें प्रेमपात्र जोडून व मंत्रतंत्रांच्या विधींचा देखावा निर्माण करून या कथालेखकांनीं आपल्या मनोराज्यांतील आवडत्या विकारांचें प्रदर्शन केलें असल्याचें खास शत्रुपक्षीय पुरावाच स्पष्ट जाहीर करित आहे. सारांश, अठराव्या व एकोणिसाव्या पहिल्या अर्ध शतकांतील ज्या लेखांची आपण इतिहासांत गणना करीत आलों ते ते लेख शास्त्रशुद्ध इतिहास नाहींत, इतकेंच नव्हे तर त्यांत ज्या भूमिकेवरून सांप्रत इतिहासलेखनाची अपेक्षा केली जाते ती राष्ट्रीय व वास्तवतेची भूमिका व तदनुरूप दृष्टिकोन हा त्याकाळीं सध्यांच्या कादंबरीनाटकादि ललित वाङ्मयलेखकांच्या लेखनमर्यादेपेक्षां अधिक शुद्ध व सत्य स्वरूपाचा नव्हता हेंहि तितकेंच स्पष्ट होत आहे. अर्थात अशा वस्तुस्थितीचा विपर्यास करून तत्कालीन लेखनपद्धतीप्रमाणें निर्माण झालेल्या या लेखनांची अधिक चर्चा चिकित्सा करण्याचें कारणच उरत नाहीं.

शिवाजीमहाराजांच्या मृत्युपूर्वीच त्यांनीं महाराष्ट्रीय जनतेस व सरदारसेनापतींस आगामी मोगली महान् संकटाची जाणीव जाहीरपणें करून दिली होती. त्या काळीं दक्षिणेंतील दिलेरखान व बहादुरखान यांच्या मोगली सैन्याच्या भरीस शहा अलमचें अर्धा पाऊण लाख सैन्य यावयाचें होतें. या जोड सैन्याच्या भीतीनें जसा आदिलशाहीनें अलमगीर बादशाहाच्या नांवानें कुत्बा पढून मांडलिकत्व स्वीकारलें तशीच कुत्बशाहीनें भरमसाट खंडणी द्यावयाची कबूल करून मैत्री पत्करली होती. अर्थात् शिवाजीमहाराजांनाहि मोगली व आदिलशाही जोड सैन्यांना तोंड देण्यासाठीं तयारी करण्याची आवश्यकता भासली. परन्तु हा मोगली आघात हिंदवी स्वराज्यावर येण्यापूर्वीच स्वराज्याचा संस्थापक नेता कठीण रोगाच्या तीव्र तापानें परलोकवासी झाला. सुदैवानें संभाजी महाराजांनीं बंदोबस्त करीपर्यंत मोगली व इतर शत्रुसैन्याला या आपत्तीची खबर लागली नाहीं व ती जेव्हां लागली तेव्हां रजपुतांच्या बंडाच्या पारिपत्यार्थ मोगली सेना परत उत्तर हिंदुस्थानांत न्यावी लागली. या घालमेलींत जो वर्षभराचा अवसर मिळाला त्यांत संभाजीराजांना मोगली परचक्राला तोंड देण्यासाठीं थोडीबहुत तयारी

---

* श्री. वा. सी. बेन्द्रे ह्यांनीं लिहिलेल्या व छापून प्रसिद्ध होऊं घातलेल्या संभाजी चरित्राचा उपसंहार त्यांच्या संमतीनें येथें प्रसिद्ध केला आहे.








करितां आली. रजपुतांचें बंड मोडतांच मोगली परचक्र पुन्हां दक्षिणेकडे वळलें. बंडखोर शहाजादा अकबर यास संभाजीमहाराजांनीं ठाव दिल्यानें तर या परचक्राची तीव्रता व व्याप्ती कितीतरी पटीनें वाढली. खासा औरंगजेब बादशाहाच आपल्या सर्व मुलांनातवां-अमिरउमरावांसह केवळ संभाजीराजे व अकबर यांच्याच पारिपत्यार्थ म्हणून अफाट सैन्य व रणसामुग्री घेऊन दक्षिणेंत उतरले. बादशाही सेना संभाजीराजांच्या सेना सामुग्रीपेक्षां कितीतरी पटीनें विशाल व सुसंपन्न होती. शिवाय बादशाही सेनेला फक्त मजबुतीनें संभाजीराजांवर आघात करावयाचे होते. उलट संभाजीराजांच्या अल्पसंख्यांक व असमृद्ध सैन्याला या आघातांना चौफेर तोंड देत राहून आपल्या राज्याचें सर्व बाजूनीं संरक्षणहि करावयाचें होतें. पातशाही अमिर-उमराव अनुभवी व वयानें आणि शक्तिसामर्थ्यानें फार मोठे होते, तर संभाजीचे अनुयायी अननुभवी व वयानें लहान म्हणजे अगदीं विशि-तिशींतील होते. खास पातशाहाजादेहि संभाजीराजांपेक्षां वयानें मोठे व अधिक समृद्ध होते. संभाजीराजांना जरी सातव्या आठव्या वर्षापासूनच राजकारणांत जातीनें भाग घ्यावा लागला होता तरी त्यांचें वय या आघाताच्या समयीं अवघें २३–२४ वर्षांचें होतें, आणि त्यांच्या सहचरी राज्ञि येसुबाईसाहेब फार तर १८–१९ वर्षांच्या असतील. उलट खासा औरंगजेब बादशाहा यांचा राजकारणांतील अनुभव व पटुत्व आणि त्यांचें रणझुंझारत्व अखिल हिंदुस्थानांत संभाजीराजांच्या वयाच्या दुप्पट म्हणजे ४३–४४ वर्षे गाजलेलें होतें. मोगली पातशाहांत अखिल उत्तर हिंदुस्थान व दक्षिणेंतील बराच मोठा प्रदेश एकतंत्री सत्तेखालीं आणणारे व आदिलशाही, कुत्बशाही, अफगाणिस्थान, इराण वगैरे प्रदेशांच्या शाहांवर प्रभुत्व गाजविणारे असे इस्लामियांच्या इतिहासांतील अलमगीर पातशाहा हे एकमेव बादशाहा होते. औरंगजेब बादशाहांचें धार्मिक बाबतींत जरी हटवादी धोरण असलें तरी त्यांचें युद्धकौशल्य, राजकारणपटुता, न्यायनिष्ठुरता, तत्कालीन अनेकविध अडचणींत किंवा गैरसोईंत एवढ्या अफाट साम्राज्याचा कारभार हांकण्याची त्यांची दक्षता व चातुर्य हीं निःसंशय उच्च दर्जाचीं होतीं. सम्राट या दृष्टीनें अलमगीर पातशाहाची बरोबरी करणारा अन्य क्वचितच आढळेल. अशा थोर सम्राटानें आपल्या सर्व अखिल हिंदुस्थानांतील शक्तिसामर्थ्यानिशीं सतत तीन वर्षे चौफेर निकरानें हल्ला चढवूनहि– काफी खान म्हणतो त्याप्रमाणें मोगली सैन्यांत "सवाई शिवाजी" म्हणून ओळखला जाणारा व "ज्वलज्ज्वलनतेजस" संभाजीराजांच्या कर्तृत्वापुढें त्या सम्राटाला हार खावी लागली. हा इतिहास महाराष्ट्राच्या इतिहासलेखकांना जरी महत्त्वाचा वाटला नसला, तरी अनुभवी सम्राटाला व तत्कालीन सर्व शूरवीर, देशी आणि परदेशीय राजनेत्यांना तसा तो वाटला होता हें पुराव्यांवरून सिद्ध आहे. अवघ्या वर्ष सहा महिन्यांच्या कालांत पुराण्या आणि समर्थ अशा आदिलशाही व कुत्बशाही राज्यांचा बळी घेणाऱ्या अवाढव्य इस्लामी साम्राज्य सत्तेला सतत नऊ वर्षे झुंजवित ठेवून व तिच्या शक्तिसामर्थ्याचा अतोनात नाश करून तिला हिंदवी स्वराज्यापासून दूर ठेवणारा, केवळ डोंगराळ व जंगली कोंकणपट्टीचा असमृद्ध अल्पवयी तरुण राजा, संभाजी युद्धकुशल आणि कर्तबगार असल्याची साक्ष तत्कालीन हिंदु, मुसलमान, फ्रेंच, पोर्तुगीज, अरब व इंग्रज या सर्वांनाच प्रत्यक्ष पटली असल्यास नवल काय ? मोगली सम्राटाला छोटेखानी हिंदवी स्वराज्याच्या या राजधुरीणाची यशस्वी कारवाई असंभाव्य कोटींतील वाटावी व त्यावरून त्यांनीं आपल्याच एकनिष्ठ मुर्ले–नातवंडें–अमीरउमराव यांचा संशय घ्यावा इतकी ती अद्वितीय कोटींतील असतांना दुर्दैवानें खास महाराष्ट्राला याच कारकीर्दीबद्दल आतांपर्यंत मान खाली घालण्याची पाळी आली होती, हीं घटनाहि इतिहासांतील विपर्यासाचें असें एक विलक्षण परंतु अद्वितीय उदाहरण त्याच संभाजीराजांच्या कारकीर्दीनें अनुभवास येत आहे. व्यक्तिस्वार्थ राष्ट्राच्या संस्कृतीलाहि कसा बाधक ठरतो याचा येथें बोध होतो.

चपळ व मजबूत माणसांच्या सैन्यभरतीसाठीं संभाजीमहाराजांनीं केलेली स्वतंत्र अधिकाऱ्यांची योजना जरी आवश्यक मनुष्यसंपत्तीची जोड करून देत होती उशीच ह्या मनुष्यसंपत्तीची हानी होऊं न देण्यासाठीं त्यांनीं आपल्या सैनिकांस उघड समरांत न लोटूं देतां गनिमी काव्यावरच पूर्ण भर देऊन मोगलाचा प्रतिकार करण्याच्या युद्धनीतीचा प्रामुख्यानें अवलंब केला होता हें त्यांच्या अनेक युद्धप्रसंगांवरून स्पष्ट दिसतें. राज्याच्या संरक्षणार्थ दारूगोळा करण्याचे कारखाने दक्षिण कोंक-

णांत चालविणें व तेथून ती युद्धसामुग्री गलबतानें जरूर त्या ठिकाणीं अडथळयाविना पोहोंचविणें वगैरेबाबत संभाजीराजांनीं घेतलेली खबरदारी व त्यानुसार केलेला पत्रव्यवहार संभाजीराजांच्या दक्षतेची व दूरदर्शित्वाची चांगलीच ओळख करून देत आहे. संभाजीराजांनीं गडोंगडीं सांठवून ठेवलेली ही युद्धसामुग्री व धनधान्य संपत्ती सर्वत्र विपुल असल्याची साक्ष त्यांच्या मृत्यू-नंतरहि परशुरामपंत प्रतिनिधींनीं दिलेली आहे. युद्ध-तयारीसाठीं संभाजीमहाराजांनीं जसे जागृकतेनें प्रयत्न केले होते तसाच त्यांनीं कठीण प्रसंगीं आघाडीवर राहून खासाच पराक्रम गाजवून व जरूर तेथें वेळींच जातीनें उपराळा करून आपल्या तरुण सेनापतींचें धैर्य व त्यांचा महाराजांच्या नेतृत्वावरील व संरक्षणावरील विश्वास अधिकाधिक दृढावत राहील अशी काळजी घेतली होती. रात्रींबेरात्रींहि दूरदूरचे प्रवास निवडक तुकडीसह घोड्यावर करित असल्याचे दाखले संभाजी महाराजांच्या शीघ्रतर युद्धविषयक हालचाली अत्यंत चपळाईनें होत होत्या याची साक्ष देतात. संधिविग्र-हाची शिवाजी महाराजांची परंपरा संभाजीराजांनीं पूर्णपणें अमलांत आणल्याचाहि निर्वाळा मिळत आहे. पावसाळ्यांत चढाई आणि चांगल्या ऋतुकालांत प्रतिकार हा नेहमीचा क्रमहि चालू होता हें संभाजी महाराजांच्या आठहि वर्षांच्या हालचालींवरून स्पष्ट आहे. आयुष्याचा आणि विशेषत कारकीर्दीचा सारा काळच रणक्षेत्रांवर संभाजीराजांना काढावा लागला. म्हणून अंतर्गत व्यव-स्थेचें अशा धामधुमीच्या कालांतील विशेष महत्त्व ओळ-खून संभाजी महाराजांनीं आपल्या पत्नीला "राज्ञिपणाचा पूर्ण मान व स्वतंत्र सहिशिक्क्यानिशीं "राजाज्ञे" चा सर्वाधिकार देऊन राज्याचा अंतर्गत सर्व कारभार येसु-बाईसाहेबांच्या स्वाधीन केला होता; आणि या राजाज्ञांच्या उपलब्ध पत्रांच्या प्रमाणांवरूनहि संभाजीराजांची राजधानींतील हजेरी फारच थोडी असल्याची खात्री पटते. धन्य त्या येसुबाईंची किं जिनें आपल्या लहान वयांतहि यशस्वीपणें आपल्या पतीला मोगली परचक्रा-च्या निवारणार्थ निश्चिंतपणें मोकळिक करून दिली. त्यामुळेंच संभाजीराजांना आपलें सर्व लक्ष या एकाच गोष्टीवर यशस्वीपणें केंद्रित करितां आलें, आणि हिंदवी स्वराज्याला अखिल हिंदुस्थानाच्या सामर्थ्यास तोंड देतां येऊन मानानें आपलें स्थान टिकवितां आलें व तसें टिकवण्यास आवश्यक असणारी शिकवणुक महा-राष्ट्राच्या या तरुण पिढीस देतां आली.

संभाजी महाराजांच्या या आठ नऊ वर्षांच्या गनिमी युद्धाच्या कालांत युद्धकलेपेक्षां त्यांच्या आंतर-राष्ट्रीय राजकारणालाच अधिक वाव मिळाला व त्यांत त्यांची पटुता विशेष प्रकर्षतेनें डोळ्यांत भरते. त्यांच्या बालपणांतच दृष्टिगोचर झालेली स्वभावसिद्ध राजकारणी प्रवृत्ति व तिची वाढ करण्यासाठीं शिवाजीमहाराजांनी घेतलेल्या काळजीबद्दलचा अबे करेचा स्पष्ट निर्देश, आणि तसेच युरोपिअन कार्यकर्त्यांना शिवाजी महाराजां-च्या कारकीर्दींतच अनुभवास आलेली संभाजी राजांची कार्यक्षमता, न्यायनिष्ठुरता आणि दरबारी वागणूक यांबाबतचे त्यांचे उद्गार हेहि संभाजीराजांच्या राजकारण-पटुतेची साक्ष देतात. धामधुमीच्या काळांत शत्रुकडील फितुरांचा किंवा बंडखोरांचा फायदा घेणें ही सामान्य नीति आहे. परंतु संभाजीमहाराजांनीं अकबराच्या "पातशाही सम्राटपदा" स हुरळून न जातां अकबर प्रकरणांत जो संयम व आपला विशेष दाखविला तो म्हणजे पातशाही सम्राट म्हणून वरचढपणानें वागूं पहाणाऱ्या अकबरास त्याचा बाह्यदर्शनीं अपमान लोकांस किंवा अनुयायांस भासूं न देतां किंवा त्याचा विरसहि न करितां आपल्या हिंदवी स्वराज्याचें स्वातंत्र्य व श्रेष्ठत्व त्यास निमुटपणें मानण्यास लावण्या-साठीं उपयोजिलेले डावपेंज व त्यांच्या तथाकथित सम्राटपदाचा उपयोग करून घेऊन औरंगजेबाच्या राजधानींत व इतरत्र उत्तर हिंदुस्थानांतील भागांत उठाव करवून मोगली सेना दक्षिणेंतून काढून लावण्याचा मनसबा हा होय. हा मनसबा इतका बिनचुक होता कीं, दुर्दैवानें तो यशस्वी होण्यास कांहीं बाह्य कारणां-मुळें विलंब लागला असला तरी तो शाहूच्या सुटकेनें साधलाच गेला. खास संभाजीराजांच्या कारकीर्दींतहि औरंगजेबाला आपल्या अर्धापाऊण लाख सैन्याला उत्तरेस परत पाठवावेंच लागलें व खासा औरंगजेबाला आपली छावणी भीमेच्या पलीकडे नेऊन बसावें लागलें होतें. अकबराच्या राजकारणाप्रमाणेंच दुसरें महत्त्वाचें राजकारण म्हणजे औरंगजेब जातीनें चालून येत आहे हें पाहून संभाजीराजांनीं दक्षिणेंतील मोगली राज-धानीवर व राजसंपत्तीवर यशस्वी छापे घालून लूट केली हें होय. हा डाव इतका यशस्वी झाला कीं,

औरंगजेबाला संभाजीराजावरील आपल्या स्वारीचा बेत लांबणीवर टाकावा लागला व अशा संभाजी-राजांच्या धाडसी कृत्याचें यश त्याच्या सेनाधिकाऱ्यांच्या गाफिलपणापेक्षां फितुरांतच असल्याचा जो त्याच्या मनानें संशय घेतला तो सारखा वाढतच गेल्यानें पादशाहाचें युद्धाबाबतचें धोरण अस्थिर राहिलें व कोणत्याहि आघाडीवर त्याला यशप्राप्ती होऊं शकली नाहीं. शिवाजीमहाराजांच्या कारकीर्दीत सुरू झालेल्या खांदेरीच्या लढ्यांत मोगली आरमाराचा एक नायक सिद्दी यास उंदेरीवर ठाव मिळाला. जंजिऱ्याच्या सिद्दीस नामोहरम करण्यांत संभाजीमहाराजांस थोडें-बहुत यश आलें नाहीं तोंच उंदेरीचा सिद्दी तापदायक होऊन बसला. त्यांस इंग्रजांचा आधार मिळाल्यानें तर या मोगली आरमाराचा ताप फारच जाणवूं लागला. तेव्हां इंग्रजांशीं दंडभेदाचें राजकारण बांधून तेथील सिद्दीचा आसरा तोडला गेल्यानें सिद्दीचा बंदोबस्त होऊन आला. परंतु त्यांत दोनतीन वर्षें गेलीं. हिंदी स्वराज्यांतील सिद्दीच्या आरमाराची लूटमार थांबली. यांपूर्वीं आदिलशाहीनें मोगलाच्या अनुज्ञेनें करित असलेल्या आगळिकीकडे दुर्लक्ष करून संभाजीराजांनीं मोगलाविरुद्ध कुत्बशाही, आदिलशाही व हिंदवी स्वराज्य यांची जूट करण्याचे यशस्वी प्रयत्न केले. तेव्हां सतत तीन वर्षें संभाजीराजांविरुद्ध अयशस्वी झालेल्या औरंगजेब पातशाहानें या जुटीपासून होणारा जोराचा प्रतिकार अधिकच अपयशास व मानहानीस कारणीभूत होणार हें जाणून संभाजीराजांस कुत्बशाही व आदिल-शाही यांची मदत होऊं नये म्हणून दोघांहि सुलतानांस आपल्या वकिलांकडून जरब देववून आदिलशाही मुलखावर शहा अलम यास चालून जाऊन खास विजा-पुरालाच वेढा घालण्यास रवाना केलें. या जुटीमागील हेतू व साध्य यांचें वर्णन कुत्बशाहाच्या पत्रांतून स्पष्टपणें आलें आहे. औरंगजेबाच्या वकिलानें कुत्बशाहीची होणारी प्रत्यक्ष मदत थांबविली. परंतु संभाजीराजांनीं कुत्बशाही-कडून अप्रत्यक्षपणें घोडदळाच्या खर्चास मदत घेऊन व आपलें घोडदळ अरबांच्या मैत्रीनें समृद्ध करून विजापुरचा वेढा लढविण्यांत आदिलशाहास साहाय्य केलें. मात्र आदिलशाही सरदारच फितुर होऊन आदि-लशाहास औरंगजेबाच्या हवालीं केल्यानें अलमगीर बादशाहानें दक्षिणेंतील एक शाही काबिज करून पहिला विजय मिळविला. नंतर मोगली सैन्यानें कुत्बशाहीवर चाल केली. कुत्बशाही दूर राहिल्यानें व मधला मुलुख मोगलाचे ताब्यांत गेल्यानें संभाजीराजांना या लढ्यांत प्रत्यक्ष भाग घेणें शक्य नव्हतें. तरीदेखील त्यांनीं मोगली सैन्यास बाहेरून सतावण्याचा व त्यांची रसद लुटण्याचा सपाटा चालू ठेवलाच होता. या राजकारणां-मुळें संभाजीराजांना मोगली सैन्याचा फार मोठा विभाग हिंदवी स्वराज्यापासून दूर राखतां आला व मोगलाच्या अर्ध्या अधिक सैन्याचा नाश करितां आला. शिवाय वेढ्याचें पायीं अडकून राहावें लागल्यानें तेथें दुष्काळानें, पावसानें व प्लेगनें मोगली फौजेची भयंकर हानी झाली. याचवेळीं मोगली वकिलानें पोर्तुगीजांस अनेक सवलती देऊन संभाजी राजांच्या मुलुखास धक्का देण्याचा वगैरे कट केला. तो कट मूर्त स्वरूप घेत आहे असें पाहातांच संभाजीराजांनीं पावसाळ्याची संधि साधून पोर्तुगीजांचा मुलुख जाळून लुटून फस्त करण्यास सुरुवात केली व खास गोंव्यावर घालून चाऊन त्यांस पूर्ण नामोहरम करून पोर्तुगीजास मोगली सैन्याला मदत करण्याच्या विचारांतून कायमचें परावृत्त केलें. मोगलाचा दुसरा हस्तक जंजिऱ्याचा सिद्दी खैरातखान, त्याची धुळदाण उड-वून दिली आणि मोगली आरमाराचा एक प्रमुख सिद्दी कासम यालाहि इंग्रजाकडून दूर करवून मोगली आर-माराचा काटा काढून टाकला. सारांश, संभाजी महा-राजांनीं येथपर्यंत जीं यशस्वी राजकारणें केलीं त्यांचा परिणाम शत्रुमित्रांवर सारखाच प्रभावपूर्ण झाला. सर्वां-नाच मोगलापेक्षां संभाजीराजांच्याच संरक्षणाखालीं अधिक सुरक्षितता वाटूं लागली. परंतु असंघटित अशा आदिलशाही व कुत्बशाहीचा त्यांच्या सरदारांच्या फितुरामुळें मोड होतांच औरंगजेबाची येथपर्यंत सहा सात वर्षें झालेली हानी सर्वप्रकारें पुष्कळच भरून निघाली. विशेषत: दक्षिणेंतील हे पठाणादि मुसलमान सरदार आपल्या लोकांनिशीं मोगली चाकरींत गेल्यानें संभाजी महाराजांस मोठाच पेंचप्रसंग निर्माण झाला व अखिल हिंदुस्थान विरुद्ध महाराष्ट्रीय हिंदवी स्वराज्य असा अत्यंत विषम सामना सुरू झाला. एकतर त्यामुळें हिंदवी राज्यांत फितुराला वाव मिळणार होता व दुसरें अरिष्ट म्हणजे मोगली सैन्य पुन्हां बलिष्ठ झाल्यानें या सैन्याला इतरत्र गुंतविण्यास मार्ग राहिला नव्हता. तरीहि संभाजीराजांनीं भडोचमार्गें आपलें










सैन्य पाठवून व मेवाड बुंदेलखंडांत उठाव करवून मोगली अर्धापाउण लाख सैन्य, ज्येष्ठ मुलगा शहा अलम व त्याचीं मुलें यांची उत्तरेकडे रवानगी करण्यास औरंगजेबाला भाग पाडलेंच. थोडक्यांत सांगावयाचें तर युद्ध व युद्धनीति यावरच संभाजीमहाराजांनीं आपलें सर्व लक्ष केंद्रित केलें होतें आणि त्यांत जीं कांहीं राजकारणकुशलता दिसून येते ती फार मोठी असून तिचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजे मोगली अफाट शक्तिसामर्थ्याच्या आघातापासून संभाजीराजांनीं आपलें हिंदवी स्वराज्य आठ नऊ वर्षें सुरक्षित राखलें. अशा धामधुमीच्या व दुर्घट संकटसमयीं राज्याचा धुरीण व समाजाचा नेता थोडाहि अकार्यक्षम राहिला असता तर तें राज्य सुरक्षित राहाणें अशक्यच झालें असतें. याचा प्रत्यक्ष पडताळा संभाजीराजांच्या मृत्युनंतर आलाच.

काव्यालंकार, शास्त्रें, पुराणें. संगीत व धनुर्विद्या यांचा संभाजीमहाराजांनीं सखोल अभ्यास केला होता. नीतिशास्त्रांतील त्यांची पारंगतता तर सर्वतोमुखीं झाली असल्याचें दिसतें. न्यायाधीश प्रल्हाद निराजी यांचेकडे शास्त्रार्थ निर्णय देण्यापेक्षां तुम्ही अधिक जाणते असल्यानें तो तुम्हीच द्या म्हणून आग्रहानें सांगणारे लोक त्या कालीं होते. संभाजीराजांनीं राजनीतीचें एक प्रकरण तयार केलें होतें. येसूबाईसाहेबहि तितक्याच प्रवीण असाव्यात. येसूबाईसाहेबांनीं अगदीं आपल्या आयुष्याच्या शेवटच्या कालांत म्हणजे शाहूच्या कारकीर्दीत "प्रथम दत्तक घेतलेल्या मुलाचे अधिकार जास्त कीं दत्तकानंतर झालेल्या मुलाचे वारसा अधिकार जास्त" असल्या शास्त्रार्थानें होणाऱ्या भांडणाचा जातीनें निर्णय दिला आहे. तसेंच चिंचवडकर देवांस लिहिलेल्या व्यक्तिगत पत्रावरून येसूबाईसाहेबांची सुविद्यता व संस्कृति सहज लक्षांत येते. दोघेहि पतिपत्नी सुविद्य व शास्त्रार्थ जाणणारीं होतीं. भारत रामायणादि ग्रंथांच्या श्रवणानें तीं सुसंस्कृत झालेलीं होतीं. त्यांनीं शिवाजीमहाराजांनीं घालून दिलेली कारभाराची शिस्त निग्रहानें पाळली होती, हें त्यांच्या अनेक पत्रांतील उल्लेखांवरून स्पष्टच आहे. सरदार सेनापतींच्या युद्धक्षेत्रांतील कारवाईवरील प्रधानमंत्र्यांचे निर्बंध मात्र परिस्थित्यनुरूप उठवून सेनाधिकाऱ्यांस खास आपल्या नेतृत्वाखालीं स्वयंनिर्णयाचे अधिकार देऊन त्यांस अधिक जबाबदार व कार्यक्षम केलें होतें. अंतर्गत राजकारभारांतील राजाचे सर्व अधिकार कोणाहि मंत्र्याला अगर मंत्र्यांना न देतां खास आपल्या पत्नीकडेच ठेवल्यानें मतभेदाची किंवा स्वार्थास्वार्थाची अडगळ काढून टाकली. स्वतःस पुन्हां महा-राजाभिषेक करवून घेऊन संभाजीराजे शिवाजीमहाराजांसारखे स्वयंसिद्ध राजे व येसूबाईसाहेब पट्टाभिषिक्त राज्ञि झाल्यानें अण्णाजी दत्तोनें अज्ञानानें अगर हटवादीपणानें स्वार्थासाठीं केलेल्या शिवाजी महाराजांच्या राजाभिषेकाधिकाराबाबतचे विपर्यस्त समज दूर केले. पुन्हां ते अधिकार शास्त्रशुद्ध असल्याचें समाजास पटवून दिलें. धर्मांतर व गुलामखरेदी यांवर अधिक कडक निर्बंध लादून परकीय व परधर्मीयांच्या अतिक्रमणाला चांगलीच लगाम घातली. पतितपरावर्तनाच्या विशेष सवलतीनें परधर्मीयांच्या या धार्मिक व्यापाराला बराच आळा घातला. मोगलाच्या स्वारींत प्रजेचें फार नुकसान होऊं नये म्हणून संबंधित भागास पूर्वसूचना देववून मोल्यवान चीजवस्तूंचें संरक्षण केलें व शत्रूच्या जाळपोळींत झालेल्या नुकसानीची जरूर ती भरपाई सवलती व द्रव्य देऊन गांवांची व पेठांची पुनर्वसाहत करण्यास प्रोत्साहन दिलें. धारातीर्थी पडलेल्यांच्या बायकांमुलांना अन्नवस्त्राची बेगमी व कांहींचे सरंजाम चालू ठेवून आणि त्यांतून कोणातरी नातेवाइकांकडून पगारी सेवाचाकरी घेतली. साधुसंतांनीं चालविलेल्या त्यांच्या देवालयांतील अन्नछत्रांना, पूजा अर्चा, दिवाबत्ती, धार्मिक महोत्सव, पुराणवाचन यांच्या बेगमीसाठीं इनामें व वर्षासनें दिलीं व तीं बिनबोभाट चालवावयास लाविलीं. मात्र या सतराव्या शतकांतील इनामांत "आशिर्वाद देऊन स्वस्थ राहाणाऱ्या कुटुंबवत्सलांना किंवा बुवाबाजी करणाऱ्या महंतादींना दानधर्म" मिळाल्याचे उल्लेख असलेच तर क्वचितच अपवादात्मक असतील. कारकून सुभे आदि नोकरांविरुद्ध तक्रारी करण्यास गरिबांपासून ते थेट श्रीमंतांपर्यंत सर्वांनाच मुभा होती व संभाजीराजांचा गरीब व संकटग्रस्त लोकांना आधार देणें हा एक विशेष होता. परगणे सुभे यांचे हिशोब वगैरेंचें काम चोख करण्यास अधिकउणा खर्च लागला तरी तोहि दिला जात असे. संभाजीकालीन पत्रलेखनाचा वाङ्मयदृष्ट्या विचार केला तर त्यांतील भाषा अधिक प्रगल्भ झाल्याचें व त्यांतील मजकुरांत राष्ट्रीय बाण्याची व








कार्यकर्तृत्वाच्या अभिमानाची छाप अधिकाधिक पडत असल्याचें दिसून येतें. शिवकालीं अण्णाजी दत्तो वगैरे मंडळींच्या विरुद्ध जशा सारख्या तक्रारी होत होत्या तशा त्याच लोकांनींहि संभाजीराजांच्या कारकीर्दीतील मंत्री व कारकून, एक प्रल्हाद निराजीबाबतची खासगी तक्रार सोडली तर, यांच्याविरुद्ध तक्रारी केलेल्या नाहींत. उलट या अधिकाऱ्यांच्या सडेतोड वागण्यामुळें परदेशियांना अधिक काळजी घेण्याची जरूर भासली होती. सारांश, संभाजीराजांचा अंतर्गत राज्यकारभार येसुबाईच्या करवीं अनेक अडचणींतहि योग्यप्रकारें चालत असल्याचें कागदपत्रांवरून दिसून येतें.

अंतर्गत राजकीय कलहांत अण्णाजी दत्तोचें कारस्थान संभाजीराजांनीं इतकें शांतपणें व रक्ताचा एक थेंबहि न सांडूं देतां मिटविलें कीं, त्या राजकारणाचा वास शेजारील शाह्यांना आला नाहीं. अण्णाजी दत्तोचें दुसरें कारस्थान पूर्णपणें राष्ट्रद्रोहाचें व राजहत्येच्या प्रयत्नाचें होतें. त्यांत संभाजीराजांनींहि शिक्षा देण्यांत भेदभाव न करितां जो गुन्हेगार त्यास देहांत शासन दिलें. ढळढळीत राष्ट्रद्रोह व अभिषिक्त राजाच्या खुनाच्या कटांत सामिल झालेल्यांना अन्य कोणतें शासन होणार ? त्यानंतर फितुरी प्रकरणीं कैदेची शिक्षा बरेच जणांस भोगावी लागली. शत्रूच्या हातीं पन्हाळा देण्यांत जे स्वराज्यद्रोही होते त्यांस, इतरांस शिस्त लागावी व दहशत बसावी म्हणून, कडेलोटाची शिक्षा झाली. पुष्कळांना क्षमा केली होती. परंतु त्यांतील कांहीं पुन्हां जहागिरीच्या लोभानें फितुरांत मिळालेच. योग्य कारणाविना कोणालाहि शिक्षा झाल्याचा उल्लेख नाहीं. या फितुरांना कैद वगैरे करून येसूबाईसाहेबांच्या हवालीं करण्यांत येत असे. त्यापैकी, कोणीहि तेथून निसटूं शकला नव्हता हा एक विशेष लक्षांत घेण्यासारखा आहे.

मंत्र्यांच्या बाबतींत शिवाजीमहाराजांचाच आदेश पाळला गेला. परंतु पूर्व मंत्र्यांचीं जीं मुलें कार्यक्षम ठरलीं नाहींत त्यांना दूर करून त्यांच्याच फडांतील तयार झालेलीं कर्तीं माणसें नेमलीं गेलीं. कांहीं वयोवृद्ध सरकारकुनांना सामान्य मानवी स्वभावधर्माप्रमाणें बालसंभाजीनें आपल्या आज्ञेंत राहावें असें वाटे. परंतु हा बालराजा त्यांच्याहून अधिक सुविद्य, ज्ञानी व अनुभवी असल्यानें या सरकारकुनांचा मनोभंग होणें साहजिक होतें. एकदोन स्वार्थी मंत्र्यानीं हा अपमान समजून राजांचा द्रोह केला, तर बाकीचे सर्व निष्ठावंत राहिले. राजा व राज्ञि कर्तबगार असल्यानें त्यांनीं आपल्या राजकारभाराचा गाडा बिनघोक हांकला, आणि तसें करतांना सर्वांनाच सारख्या जिव्हाळ्याची वागणुक मिळाल्यानें ही सर्व मंडळीं या राजदांपत्यावरील पूर्ण भक्तिभावानें व राजनिष्ठेनें आपल्या हिंदवी स्वराज्याची सेवा प्राण पणाला लावूनहि करित राहिलीं. येसुबाईवर लोकांची जितकी निष्ठा होती तितकीच त्यांना बाईच्या करारी स्वभावाची भीतीहि वाटत होती, हेंहि कांहीं प्रसंगांवरून आणि पत्रव्यवहारावरून उमगून येतें. सारांश, संभाजीमहाराज व त्यांच्या राजप्रतिनिधि "सखि व राज्ञि" येसुबाईसाहेब यांचा अंतर्गत कारभार फार दक्षतेनें हांकला जात होता यांत शंका नाहीं.

कौटुंबिक परिवारांत येसुबाईसाहेब ही एकटीच जाणती व शिवाजीमहाराजांची आवडती सून असल्यानें तिच्यावर संभाजीराजांच्या सर्वच सावत्रमातांचें प्रेम असल्यास नवल नाहीं. अण्णाजीनें सोयराबाईस अचानक आपल्या कटांत गुंतवल्याकारणानें, मोरोपंतांसारखच, तिला थोडया जनापवादाला निष्कारण धनी व्हावें लागलें. त्यामुळें सोयराबाई व येसुबाई यांचा एक वर्षाचा सहवास कदाचित तितका सुखकर झाला नसणें शक्य आहे. परंतु ती नंतर फार दिवस जगलीहि नाहीं. राजाराममहाराजांचा तर सर्व ओढा येसुबाईकडेच होता आणि त्यांनीं आपल्या वडील बंधुबद्दल अगर आपल्या भावजयीबद्दल कांहींहि विरोधिभाव दर्शविलेला नाहीं. उलट त्यांच्या पत्रांवरून त्यांची संभाजीराजांवर फार निष्ठा असावी असेंच दिसतें. राज्य संभाजीचें व त्यांच्यानंतर त्यांच्या मुलाचें ही धर्मसिद्ध व शास्त्रशुद्ध घटना त्यांनीं आपल्या पत्रांत आपुलकीच्या तीव्र मनोभावनेनें दिग्दर्शित केलेली आहे. आपला पुतण्या लहान म्हणूनच केवळ हा राज्यकारभार त्यांनीं शिरावर घेतला होता ही त्यांची पूर्ण जाणीव होती. ताराबाई व राजसबाई यांचीं लग्नें येसुबाईच्याच हातीं घडून आलीं होतीं. या भावजयांना संभाजीराजे व येसुबाईसाहेब यांचा द्वेष करण्याचें कारणच नव्हतें.

अकल्पित व आकस्मिकपणें कैद झालेल्या संभाजीराजांस पातशाहापुढें उभें करितांच औरंगजेबाला आपल्या साऱ्या आयुष्यांत इतका फजित करणारा शत्रु

घेटला नव्हता, त्या शत्रुसंकटाचें निरसन ईश्वरानें केलेलें पाहून पादशाहाला हायसें वाटलें आणि त्यांनीं तात्काळ ईश्वराची प्रार्थना म्हटली. असा पादशाहावर कधींच प्रसंग आला नव्हता. ही औरंगजेबाची हाल-चाल मोगली पातशाहीवर संभाजीराजांच्या थोर राज-कारणांच्या परिणामांच्या तीव्रतेचें प्रदर्शनच करिते.

सारांश, सुरुवातीस सुचविल्याप्रमाणें संभाजीमहा-राजांची सांप्रतच्या इतिहासांत जी फक्त दुराचारी व दुर्व्यसनी म्हणून जमा केली गेली आहे ती संपूर्णतः काल्पनिक किंवा अवास्तव आहे. या समाजाच्या अगदीं उलट अशी तत्कालीन वस्तुस्थिती असल्याचें निदर्शनास येतें. संभाजीमहाराजांनीं आपल्या कार-कीर्दीचा, कदाचित आयुष्याचाहि, क्षण नि क्षण "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन" या मनो-वृत्तीनेंच वेंचला; आणि राजभोग तर राहोच पण सामान्य गृहसुखाच्याहि लाभास विन्मुख राहून मोगली परचक्राला तोंड देण्यासाठीं, कर्तव्यनिष्ठेनें म्हणा किंवा स्वराज्यनिष्ठेनें म्हणा, त्यांना सतत झगडत राहावें लागलें. तसेंच आपल्या भीषण मृत्युसम-यींच्या कालांत धारण केलेल्या स्थितप्रज्ञतेनें संभाजी महाराजांनीं "स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः" या गीतावचनाची अति तेजस्वी अशी जाणीव करून देऊन महाराष्ट्राच्या प्रतिकारांतील चैतन्य जागृत राखलें. या ज्वलज्ज्वलनतेजस छत्रपति संभाजीमहाराजांची व त्यांची "सखि" आणि "राज्ञि" येसूबाईसाहेब यांची नऊ वर्षांची कारकीर्द अत्यंत महत्त्वपूर्ण प्रसंगांनीं आणि अनेक व विविधप्रकारच्या हालचालींनीं भरलेली आहे. या सर्व प्रसंगांचा आणि विशेषतः एकट्या संभाजीमहाराजांनीं अखिल हिंदुस्थानांतील शक्ति-सामर्थ्याशीं हिंदवी स्वराज्यासाठीं सुसंघटितपणें दीर्घ-काल दिलेल्या झगड्याचा विचार केल्यास महाराष्ट्राची अखिल हिंदुस्थानांत व परदेशांत गाजलेली खरी कर्तबगारी, उज्वल संस्कृति व तेजस्वी राष्ट्रीय संघटना यांच्या खऱ्या कसोटीचा आदर्श संभाजी महाराजां-च्याच कारकीर्दींत दिसून येत आहे. हा आदर्श महाराष्ट्रास आणि हिंदवी स्वराज्यास सदोदित राष्ट्रीय संघटनेच्या व संस्कृतीच्या उच्च पातळीवर राखो, हीच सर्वेश्वराजवळ अनन्य भावानें प्रार्थना.

---

॥ श्री ॥

# दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लिमिटेड, पुणें–२.

पुढती पुढती पुढती । इया ग्रंथ पुण्यसंपत्ती ।
सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होईजे ॥ श्री ज्ञानेश्वरी

## १९३४ रौप्यमहोत्सवी वर्ष १९५९

**स्थापना : २१ सप्टेंबर १९३४**

कै. श्री. चंद्रशेखर गोविंद आगाशे यांनीं दीर्घ प्रयत्नानें, चिकाटीनें व धडाडीनें चालवून पूर्ण यशस्वी केलेल्या या मध्यमवर्गीयांच्या मालकीच्या एकमेव साखर कारखान्याला २१ सप्टेंबर १९५९ रोजीं पंचवीस वर्षें पूर्ण झालीं आहेत. या आनंददायी व शुभ प्रसंगीं कै. श्री. आगाशे यांच्या पुण्यस्मृतीस आम्ही सादर प्रणाम करीत आहोंत.

तसेंच

ही कंपनी यशस्वी करण्यास ज्या भागीदारांनीं, ठेवीदारांनीं व हितचिंतकांनीं सहाय्य दिलें व संकटाचे काळांत सुद्धां कंपनीबद्दलची आपुलकी कायम ठेवली, त्या सर्वांना मनःपूर्वक धन्यवाद देऊन असेंच प्रेम कायम ठेवावें अशी विनंति करीत आहोंत.

## नवा हंगाम दसऱ्याचे शुभदिनीं सुरू झाला आहे

**आमचे भागीदार, ठेवीदार व हितचिंतक यांना दिवाळी व नूतन वर्ष सुखाचें व भरभराटीचें जावो !**

**संचालक मंडळ**

श्री. शं. ल. लिमये, B. SC., LL. B., वकील, अध्यक्ष.

श्री. शं. भ. कोंडे देशमुख, व्यापारी
श्री. ग. ह. सबनीस
श्री. रामराव देशमुख, M. A., LL. B. (Cant.), Bar-at-Law, M. P.
श्री. ज. चं. आगाशे
श्री. भ. ग. भादुले, B. SC. LL. B., वकील
श्री. श्री. र. केसकर, वकील
श्री. वि. कृ. साठे, B. A. (टिळक) माजी पुरवठा मंत्री, मुंबई राज्य
श्री. गो. न. जोशी, B. SC.,

श्री. के. व्यं. चांफेकर, B. E., A. M. I. E., मॅनेजर

प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# तिसरी पंचवार्षिक योजना : १ :

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेचे वेध लागून आतां कांहीं महिने उलटले आहेत. दुसरी पंचवार्षिक योजनाच नीट पार पडते कीं नाहीं याच काळजींत या आधींचा काळ आपण घालवला होता. सुदैवानें ती काळजी आतां बरीचशी दूर झालेली आहे. परकीय चलनाचा जो प्रश्न आपल्याला भेडसावीत होता तो दुसऱ्या योजनेच्या काळापुरता तरी आतां सुटल्यासारखा आहे.

परंतु नियोजनाला कधीं खंड नसतो, उसंत नसते. भारतासारख्या अप्रगत आणि दरिद्री राष्ट्रांत तर असा विसावा घेणें अशक्यच असतें. कारण वाढत्या लोकसंख्येचा वाघ सारखा मागें लागलेला असतो. यामुळें दुसरी पंचवार्षिक योजना संपली कीं लागलीच तिसरी, तिच्यानंतर चौथी असें हें सतत चक्र कित्येक दशकें तरी चालूं रहाणार आहे; रहावयास पाहिजे.

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेविषयीं विचार करावयास, तज्ज्ञांनीं, समित्यांनीं, व्यापारी औद्योगिक संघटनानीं सुरुवात केली आहे. कॉंग्रेसपक्षाच्या नियोजनविषयक उपसमिती – (Planning Sub Committee) नें केलेला विचार आपल्यापुढें आहे. या उपसमितीनें मांडलेल्या विचारावर A. I. C. C. च्या बैठकींत चंदीगड येथें नुकतीच चर्चाहि झाली. ही उपसमिति व नियोजन मंडळ या वेगवेगळया संघटना आहेत. परन्तु देशांत मध्यवर्ती सरकारहि कॉंग्रेसपक्षाचेंच आहे व केरळखेरीज इतरत्र राज्यांतहि आज कॉंग्रेस पक्षच अधिकारावर आहे. साहजिकच या पक्षाचें जें ध्येयधोरण ठरेल त्याचा ठसा नियोजन मंडळाच्या कामावर हा उमटणारच. या उपसमितीनें मांडलेल्या विचाराखेरीज Federation of Indian Chambers of Commerce and Industry या संस्थेनें तिसऱ्या पंचवार्षिक योजनेविषयी आपली एक रूपरेखा मांडली आहे (The Third Five Year Plan : A Tentative Outline. Sept. 1959). ही रूपरेखाहि अर्थातच पुष्कळ ढोबळ अशीच आहे. परंतु खाजगी भांडवलदारांचा आपल्या नियोजनाच्या प्रयत्नाकडे पहावयाचा दृष्टिकोण समजून घ्यावयास तिची मदत होते. अधिकारारूढ पक्ष व खाजगी अर्थक्षेत्र अशा या दोन महत्त्वाच्या संघटनांचे विचार आज प्रामुख्यानें आपल्यासमोर आहेत. अशा रीतीनें प्रत्येक नवी योजना हातीं घेण्यापूर्वी दोन एक वर्षें तरी विचारमंथन व्हावें लागतें.

नियोजन मंडळाची योजनेची रूपरेखा बाहेर पडली कीं अर्थातच या विवेचनाला, वादविवादाला अधिक निश्चित बैठक प्राप्त होते. कारण नियोजन नीट आखण्यासाठीं आवश्यक असणारा विविध गोष्टीविषयींचा तपशील नियोजन मंडळालाच उपलब्ध असतो. भारतासारख्या अप्रगत राष्ट्रांत सर्व हवी ती माहिती नेमकेपणानें नियोजन मंडळाला देखील उपलब्ध नसते. कारण ती माहिती गोळा करण्याची तितकी कार्यक्षम यंत्रणा आतां हळूहळू उभी होत आहे. ती नीटपणें कार्यकारी झाली नाहीं तोपर्यंत माहितीचा हा अपुरेपणा तसाच राहणार. महत्त्वाचे निर्णय घेतांना हा अपुरेपणा अनेकदां अत्यंत जाचक ठरतो. ( उदा० भारतांत अन्नधान्याचें नेमकें उत्पादन किती होत आहे ? त्यापैकीं किती साठे करून दडविलें जात

आहे ? किंवा – खाजगी अर्थक्षेत्रांत भांडवलाची नेमकी गुंतवण किती होत आहे ? – इत्यादि ).

या अशा विविध अडचणी असल्या तरी तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या एकूण आकारमानाविषयीं कोणाच्याहि विचारांत फारसें दुमत आढळून येत नाहीं. जी योजना १०००० कोटी रुपयांची तरी कमीतकमी असेल अशीच सर्वांची अपेक्षा आहे. कांहीजण हा आंकडा १० हजार ते १३ हजार कोटींच्या दरम्यान राहील असें मानतात. दुसरी पंचवार्षिक योजना आखतांनाच तिसऱ्या योजनेचा आकार हा ९९०० कोटी रुपयांचा राहील असें सांगण्यांत आलेलें होतें. किंबहुना चौथी व पांचवी पंचवार्षिक योजना प्रत्येकीं कोणत्या आकाराची असेल हेंहि त्याचवेळीं मांडून ठेवण्यांत आलें आहे.

हा काय प्रकार आहे ? भावी कालाचा इतका निश्चित अंदाज घेतां येईल इतक्या परिणत अवस्थेला नियोजन येऊन पोहोंचलेलें आहे काय ? या प्रश्नाचें उत्तर 'नाहीं' असेंच आहे. मग हे आंकडे कसे सांगण्यांत येतात ? व या साऱ्याजणांचे आकारमानाचे हे आंकडे सामान्यपणें कसे जुळतात ? यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. कारण काय शक्य आहे यापेक्षां काय इष्ट आहे याचा विचार करूनच हे आंकडे तयार केले जातात. आणि या पद्धतीनें आंकडे तयार करणें हें एक सोपें अंकगणित असतें.

भारताची लोकसंख्या दर दहा वर्षांनीं कसोशीनें मोजण्यांत येते. यामुळें तो आंकडा माहीत असतो. या लोकसंख्येंत दरवर्षी वाढ होत आहे ही गोष्टहि माहीत आहे. या वाढीची गति निश्चित किती आहे तें माहीत नाहीं. परंतु त्यांतल्या त्यांत शास्त्रशुद्ध अंदाज करण्याचे जे प्रयत्न अलीकडे झाले त्यावरून नियोजन मंडळाच्या अपेक्षित कल्पनेपेक्षांहि अधिक गतीनें आपली लोकसंख्या सध्यां वाढत आहे असें आढळून येतें. ही वाढ दरवर्षी दीड ते दोन टक्क्यांच्या दरम्यान होत असावी असा अंदाज आहे. या माहितीवरून तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या सुरवातीला म्हणजे १९६१मध्यें भारताची लोकसंख्या इतकी असेल व त्या योजनेच्या शेवटीं ( १९६६ मध्यें ) ती इतकी होईल असे आंकडे काढतां येतात.

राष्ट्राचें एकूण वार्षिक उत्पन्न किती याचाहि आंकडा आपण कसोशीनें काढण्याचा प्रयत्न करीत असतो. येथेंहि हे आंकडे शंभर टक्के बरोबर असतात असें म्हणतां येणार नाहीं परंतु ते पुष्कळसे बरोबर असतात व तुलनात्मक दृष्टीनें पाहिल्यास वस्तुस्थितींतील फेरफाराचे योग्य निदर्शक असतात असें म्हणतां येईल. राष्ट्राच्या ऐकून उत्पन्नाला राष्ट्राच्या लोकसंख्येनें भागलें कीं सरासरी माणशीं उत्पन्नाचा आंकडा मिळतो.

सरासरी माणशीं उत्पन्न वर जावें ( किंमतींचें प्रमाण वर न जातां ) व माणसाला अधिक चांगलें जीवनमान उपलब्ध व्हावें यासाठीं तर नियोजनाचा अट्टाहास असतो. अशी वाढ जर होणार नसेल तर हा अवाढव्य खटाटोप आणि यातायात तरी कशासाठीं असाच प्रश्न कोणीहि विचारील. अप्रगत दरिद्री राष्ट्रांत, जनता जर राजकीयदृष्ट्या जागृत असेल तर ती एवढाच प्रश्न विचारून थांबणार नाहीं. तुमच्या प्रयत्नानें आमचें जीवनमान सुधारणार नसेल तर ज्या मार्गानें तें सुधारण्याची शक्यता असेल त्यामार्गानें आम्ही जाऊं या भूमिकेवर ती जनता येऊन पोहोंचेल. साम्यवादी क्रान्तीचा मार्ग अशा वेळींच आकर्षक वाटूं लागतो. म्हणून जमेल तितकें जीवनमान वर नेण्याचा प्रयत्न करूं अशी नेमस्त नेमळी भूमिका घेऊन भारतासारख्या राष्ट्राला चालण्यासारखेंच नाहीं. आपल्या लोकशाही नियोजनानें आपली कार्यक्षमता पुढील पांचदहा वर्षांत सिद्ध तरी केली पाहिजे नाहीं-तर लोकशाही बाजूला सारून हुकूमशाहीला वाट मोकळी तरी करून दिली पाहिजे हा काळानें आपल्यापुढें टाकलेला पेंचप्रसंग आहे.

आणि म्हणूनच आपल्या सामर्थ्याच्या मानानें आपल्याला काय शक्य आहे याचा विचार करण्यापेक्षां आपल्या गरजेच्या मानानें काय इष्ट आहे या दृष्टीनें आपण आपल्या नियोजनाच्या आंखणीकडे प्रथम पाहतो. यामुळें एक फायदा होतो. किती मोठया प्रमाणावर प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे याची आपली आपल्यालाच कल्पना येते. खेरीज, भारतीय लोकशाहीविषयीं सहानुभूति बाळगणारीं जीं राष्ट्रें आहेत त्यानाहिं भारताला किती प्रमाणात मदत देणें आवश्यक आहे याचीहि यामुळें कल्पना येऊं शकते. परंतु या फायद्याबरोबरच मोठा धोकाहि आहे. लोकांच्याकडून पुरेसा यत्न झाला नाहीं तर ? परकीय मदत अपुरी पडली तर ? अपेक्षिलेल्या भांडवलापेक्षा कमी भांडवल उभें झालें तर ? तर परिस्थिति मोठी बिकट असते. कारण नियोजन म्हणजे केवळ अनेक कामांची केलेली एक यादी नसते. पैसा कमी पडला तर या यादींतील कांहीं गोष्टी कमी करूं असें म्हणून चालण्यासारखें नसतें. कारण नियोजित विकासांत अर्थव्यवस्थेच्या सर्व अंगांचा परस्पराशीं एकात्म संबंध असतो. यांतील एक भाग अपुरा राहिला किंवा लुळा पडला तर सर्व अर्थव्यवस्थेला धक्का लागण्याचा संभव असतो. अशा अडचणीच्या प्रसंगांतून दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत आपण नुकतेच कसेबसे सुटलेले आहोत.

परंतु आपण सुरूं केलेल्या गणिताचें तरी पुढें काय झालें ? दरवर्षी दरमाणशीं उत्पन्न वाढतें ठेवणें भारताला आत्यंतिक निकडीचें आहे हें आपण पाहिलें. हें उत्पन्नवाढीचें प्रतिवार्षिक दरडोई प्रमाण चार टक्के असावें असें दुसऱ्या योजनेनें कल्पिलेलें होतें. तोच वाढीचा दर तिसऱ्या योजनेच्या काळांत कायम ठेवावयाचा असें जरी म्हटलें तरीदेखील १९६१ शीं तुलना करतां १९६६ मध्यें प्रतिवर्षी जवळजवळ ४२५० कोटी रुपयांची भर पडेल इतक्या प्रमाणांत उत्पन्न वाढावें लागेल.

यावरून किती उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न या काळांत भारताला करावा लागेल याची कल्पना येते. परंतु उत्पन्न वाढवावयाचें असेल तर त्यासाठीं नवें भांडवल गुंतवावें लागतें ? प्रतिवर्षी किती उत्पन्न वाढविण्यासाठीं किती भांडवल गुंतवावें लागतें याचेंहि एक प्रमाण आहे. हें प्रमाणहि कालपरत्वें, स्थलपरत्वें, व्यवसायपरत्वें बदलूं शकतें. तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत हें भांडवलाची गुंतवण व उत्पन्नाची वाढ यांतील प्रमाण ( capital output ratio ) २.६ : १ या प्रमाणांत असेल अशी अपेक्षा आहे. या अपेक्षेप्रमाणें पाहिलें तर सुमारें ४२५० कोटी रुपयांची वाढ उत्पन्नांत करण्यासाठीं जवळजवळ ११००० कोटी रुपये भांडवल गुंतवलें पाहिजे असा त्याचा अर्थ होतो. म्हणजेच आपल्या तिसऱ्या योजनेचें आकारमान सामान्यपणें ठरतें.

योजनेचें आकारमान ठरविणें हें या दृष्टीनें सोपें आहे. योजनेचें स्वरूप ठरवणें हें याहून अवघड असतें. कारण त्या ठिकाणीं ध्येयधोरणाचा प्रश्न निर्माण होतो. ( उदा. खाजगी अर्थक्षेत्राचा आकार कोणता असावा ? कोणते उद्योगधंदे खाजगी अर्थक्षेत्रांत राहूं द्यावेत ? ग्रामोद्योग, लहान उद्योगधंदे यांचें अर्थव्यवस्थेंत कोणतें स्थान असावें ? परकीय भांडवलाविषयीं काय धोरण आखावें ? इत्यादि अनेक प्रश्न निर्माण होतात. ) हा प्रश्न सोडवल्यानंतर योजनेसाठीं लागणारें भांडवल कसें उभें करावें हा अत्यंत बिकट प्रश्न समोर येऊन उभा राहतो.

'सगळीं सोंगें आणतां येतात पण पैशाचें सोंग आणतां येत नाहीं' असें आपण व्यवहारांत म्हणतो. राष्ट्राच्या बाबतींत ही म्हण जशीच्या तशी लागूं पडत नाहीं. कारण राष्ट्राला पैशाचें सोंग वाटल्यास आणतां येतें. चलनवाढ केली कीं झालें. यामुळें राष्ट्राला सगळीं सोंगें आणतां येतात परंतु भांडव-

त्याचें सोंग आणतां येत नाहीं असें म्हटलें तर तें अधिक योग्य होईल. राष्ट्राला भांडवल मिळण्याचे प्रमुख मार्ग तीन: (१) परकीय भांडवल (२) अंतर्गत बचत करून निर्माण झालेलें भांडवल व (३) तुटीचा अर्थभरणा (deficit financing) करून उभें केलेलें भांडवल. या मार्गांचे प्रकार आणि तपशील वेगवेगळे झाले तरी शेवटी ते या तीन-पैकी कोणत्या तरी एका वर्गात येऊन बसतात.

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत हें भांडवल कोणत्या पद्धतीनें उभें करावें लागेल हें पाहिलें कीं आपल्यासमोरील अडचणींची कल्पना येऊं शकेल. पहिल्या योजनेच्या काळांत ही अडचण इतकी जाणवली नाहीं कारण ती योजनाच एकूण आटोपशीर पेलणाऱ्या आकाराची होती. सरकारी अर्थक्षेत्रांत २४०० कोटी रुपये व खाजगी अर्थक्षेत्रांत १६०० कोटी रुपये असा एकूण तिचा ४००० कोटी रुपयांचा आकार होता. दुसऱ्या योजनेप्रमाणें सरकारी अर्थक्षेत्रांत ४८०० कोटी रुपये व खाजगी अर्थक्षेत्रांत २४०० कोटी रुपये अशी एकूण ७२०० कोटी रुपयांची भांडवल गुंतवण व्हावयाची होती. आपल्या मांडणीप्रमाणें तिसऱ्या योजनेंत हा एकूण आंकडा ११ हजार कोटी रुपयापर्यंत वर जाईल.

केवळ एवढेंच नाहीं. पहिल्या योजनेला आपल्या पौन्डी गंगाजळीचा भरभक्कम आधार होता. दुसऱ्या योजनेच्या पहिल्या दोन वर्षांतच आपल्या भोंगळ आयात-निर्यात धोरणामुळें ही गंगाजळ खाडकन् घटली. आज ती २०० कोटी रुपयांच्या आसपास आहे. (युद्ध संपलें तेव्हां हा आंकडा १७०० कोटी रुपयांच्याहि वर होता. पुष्कळशी गंगाजळ अन्नधान्य आयात करण्यासाठीं खर्ची पडली. कांहीं चुकीच्या आयात धोरणामुळें उधळली गेली. कांहींचा उपयोग यंत्रसामग्री व औद्योगिक विकासासाठीं लागणारा महत्त्वाचा माल आणण्यासाठीं झाला.) आज असलेली २०० कोटी रुपयांची मर्यादा आणखी खाली उतरवणें धोक्याचें ठरेल आणि म्हणून अगदी तशीच आणीबाणीची परिस्थिति आल्याखेरीज सहसा तसें केलें जाणार नाहीं.

याचाच अर्थ तिसऱ्या योजनेच्या काळांत आपल्याला भांडवल उभें करण्यासाठीं अधिक निकराचा प्रयत्न करावा लागणार आहे. या ठिकाणीं असाहि एक विचार कधीं कधीं मांडला जातो कीं प्रत्येक योजनेंत एकूण राष्ट्रीय उत्पन्न वाढत असल्यामुळें त्या वाढलेल्या उत्पन्नांतून भांडवल उभें केल्यास लोकांवर भांडवलासाठीं बचत करतांना आपलें जीवनमान खालीं उतरविण्याची पाळी येणार नाहीं. कारण ही बचत वाढलेल्या उत्पन्नांतून झालेली असेल. दुर्दैवानें अप्रगत दरिद्री राष्ट्रांत ही गोष्ट इतकी साधी सरळ आणि सोपी नसते. वाढलेलें उत्पन्न दारिद्र्यांत पिचणाऱ्या लोकांच्या गरजांत कोठल्याकोठें जिरून जातें त्याचा पत्ताहि लागत नाहीं. तापलेल्या जमिनीवर पावसाचे चार थेंब पडले तर तें पाणी कांहीं विहिरी तळयांच्या सांचवणींला जाऊन सांठत नाहीं. यामुळें केवळ एकूण उत्पन्न वाढत आहे या विश्वासावर अधिक भांडवल उभें करणें सहज शक्य आहे असें मानणें चुकीचें होईल. कसोशीचे प्रयत्न झाल्याखेरीज व जनतेचें उत्साही सहकार्य मिळाल्याखेरीज ही गोष्ट अशक्य आहे.

प्रथम परकीय भांडवलाचा प्रश्न विचारांत घेऊन बाजूला करूं. परकीय भांडवल मिळालें कीं एकूण आपल्याकडील भांडवल वाढतें ही गोष्ट तर खरीच. परंतु याखेरीज अंतर्गत भांडवल करूं शकणार नाहीं अशी गोष्ट परकीय भांडवलांतून मिळालेल्या परकीय चलनानें आपल्याला करतां येते. ती म्हणजे यन्त्रसामग्रीची आयात. भारतासारखा देश आज आपल्याला हवी असलेली यंत्रसामग्री स्वतः बनवूं शकत नाहीं. आणखी एखादें दुसरें दशक तरी कमीतकमी अशाच परिस्थितींत जाईल. विकासासाठीं यन्त्रसामग्री पाहिजे व ती आयात करण्यासाठीं

परकीय चलनाची गरज आहे व कांहीं वर्षें तरी ती गरज तशीच रहाणार आहे. आन्तरराष्ट्रीय व्यापारांत आपल्या आयातीपेक्षां निर्यात अधिक ठेवूनहि आपल्याला परकीय चलन मिळवतां येतें, किंवा पूर्वी मिळवलेल्या चलनाचा साठा अधिक काळ पुरवतां येतो. आयातीपेक्षां निर्यात अधिक ठेवणें भारताला आज अनेक कारणामुळें शक्य नाहीं; यामुळें परकीय चलन मिळविण्यासाठीं दुसरे मार्ग पाहणें भारताला आवश्यकच आहे.

परकीय भांडवल हें तीन मार्गांनी मिळूं शकतें: ( १ ) परकीय सरकारनें दिलेलें कर्ज किंवा मदत; ( २ ) जागतिक बँक, (International Bank for Reconstruction and Development ) किंवा आंतरराष्ट्रीय निधिसंस्था ( International Monetary fund) या सारख्या आंतरराष्ट्रीय संस्थाकडून मिळणारें कर्ज; ( ३ ) परदेशांतील खाजगी भांडवलदारानी पुरविलेलें भांडवल. या तीनहि बाबतींत भारताची परिस्थिति काय आहे हें पाहिलें पाहिजे.

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत भांडवल गुंतवणीसाठीं म्हणून सुमारें १५०० कोटी रुपयांची परकीय मदत आपल्याला लागेल असा अंदाज आहे. पहिल्या योजनेच्या काळांत आपण १८८ कोटी रुपयांची परकीय मदत वापरली. (प्रत्यक्षांत याहून अधिक मिळालेली होती. उरलेली रक्कम आपल्याला दुसऱ्या योजनेच्या काळांत वापरावयास मिळाली. ) दुसऱ्या योजनेच्या काळांत एकूण सुमारें ११०० कोटी रुपयांची परकीय मदत आपण उपयोगांत आणत आहोत. परंतु दुसऱ्या योजनेच्या काळांत या बाबतींत आपली कशी घांदल उडाली होती तो इतिहास ताजा आहे.

आपल्याला अलीकडे मिळालेल्या परकीय मदतीविषयींची जर थोडीशी माहिती पाहिली तर आपल्या-पुढील या प्रश्नाचें स्वरूप समजावून घेण्यास मदतीचें होईल.

१९५५ च्या अखेरीस आन्तरराष्ट्रीय आर्थिक व्यवहाराचा एकूण विचार केला असतां भारताची परिस्थिति ऋणकोची असण्याऐवजीं धनकोची होती. प्रथमदर्शनी हें विधान आश्चर्यजनक वाटतें. परंतु आपली युद्धकाळांत सांठलेली पौन्डी गंगाजळ हें याचें मुख्य कारण होतें ही गोष्ट लक्षांत घेतली कीं या आश्चर्याचें कारण उरत नाहीं. १९५५ मध्यें सरकारी अर्थक्षेत्रांत आपल्या आंतरराष्ट्रीय भांडवली देण्याघेण्याच्या व्यवहारांत आपलें येणें हें देण्याहून ९७० कोटी रुपयानी अधिक होतें. खाजगी अर्थक्षेत्रांत (परकीय खाजगी भांडवल वगैरे ) मात्र आपलें देणें येण्याच्या रकमेहून ४७० कोटी रुपयानी अधिक होतें. म्हणजेच दोन्ही क्षेत्रांचा एकत्र विचार केला असतां आंतरराष्ट्रीय व्यवहारांत भारताची परिस्थिति ५०० कोटी रुपयांच्या धनको राष्ट्राची होती. १९५६ व १९५७ या दोन वर्षांत सरकारी अर्थक्षेत्रांत ९७० कोटी रुपयांच्या धनको स्थानावरून घसरत आपण केवळ २७० कोटी रुपयानीच धनको राहिलो. खाजगी अर्थक्षेत्रांत आपली ऋणको स्थिति आणखी सुमारें ७० कोटीनी वाढली. म्हणजेच एकूण आपली आन्तरराष्ट्रीय आर्थिक व्यवहारांतील स्थिति १९५५ मधील पांचशें कोटी रुपयांच्या धनको स्थानावरून ढळून २७० कोटी रुपयांच्या ऋणको स्थानापर्यंत खाली उतरली. परकीय भांडवलाचा प्रश्न पौंडी गंगाजळ २०० कोटी रुपयापर्यंत खाली आल्यामुळें बिकट झाला.

१९५६ मध्यें आपल्या देशांत परकीय खाजगी भांडवल किती गुंतवलें गेलेलें होतें हें पाहिलें म्हणजे वेगवेगळ्या राष्ट्रांचें या व्यवहारांतील स्थान कळून येतें. यावर्षी भारतांत एकूण ५०६ कोटी रुपयांचें परकीय खाजगी भांडवल गुंतवलेलें होतें. त्याची आंकडेवारी अशी: ब्रिटन– ४०६ कोटी,



अनुक्रमणिका







U. S. A. – ४७ कोटी, जर्मनी – ३ कोटी, स्वित्झर्लंड ८ कोटी, पाकिस्तान– ४ कोटी, जागतिक बँक– १५ कोटी, + इतर देश– २३ कोटी, असे एकूण ५०६ कोटी रुपये. यापैकीं ब्रिटनचा आंकडा हा साहजिकच खूप मोठा आहे व त्या भांडवलाची गुंतवणहि मुख्यत्वेंकरून हिंदुस्थान स्वतंत्र होण्यापूर्वीच्या काळांत खाजगी ब्रिटिश भांडवलदारानी भारतांत केली होती.

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेसाठीं परकीय खाजगी भांडवल कितपत उपलब्ध होऊं शकेल असा विचार करूं लागलें तर आपल्या एकूण गरजेच्या मानानें कांहीं फार मोठा आंकडा गृहीत धरतां येत नाहीं. परदेशांतून भारतांत असें खाजगी भांडवल १९५४-५५ या दोन वर्षांत सरासरी १६ कोटी रुपये, १९५६ मध्यें २५ कोटी रुपये व १९५७ मध्यें १७ कोटी रुपये आलें. ( १९५७ मधील आंकड्यांत ब्रिटनचें ६ कोटी ३० लक्ष व U. S. A. चें १० कोटी ४० लक्ष रुपयांचें भांडवल होतें. U. S. A. नें याप्रमाणें येथें प्रथमस्थान घेतलेल आहे. परंतु तें तात्पुरतें ठरण्याचाच संभव अधिक आहे. कारण त्या देशांतून आलेलें जवळजवळ ९० टक्के खाजगी भांडवल तेलाच्या ( Petroleum ) उत्पादनाच्या क्षेत्रांत आलें आहे. १९५८ मध्यें पेट्रोलिअमसाठीं येणारा हा प्रवाहहि घटला आणि १० कोटींचेंच परकीय खाजगी भांडवल भारतांत आलें.

आपल्या गरजेच्या मानानें ( तिसऱ्या योजनेंत एकूण परकीय भांडवल आपल्याला जवळजवळ १५०० कोटी रुपयांचें लागेल ) या रकमा अगदीच तुटपुंज्या आहेत. परंतु तरीहि हा प्रवाहहि शक्य तेवढा वाढविण्याचा प्रयत्न करणें आवश्यक आहे. यासाठीं परकीय भांडवलाला योग्य तें आश्वासन ( राष्ट्रीयीकरणाविषयीं ) व सवलती ( कर आकारणी, नफा परत स्वदेशी नेण्याची व्यवस्था यासारख्या गोष्टींत ) उपलब्ध करून देऊन परकीय खाजगी भांडवल आंत येण्यास उत्तेजन देण्याचें धोरण आपण स्वीकारीत आहोंत. परंतु आशियाखंडांतील एकूण राजकीय वातावरण अस्थिर आहे तोपर्यंत खाजगी भांडवलदारांना या खंडांतील भारतासारख्या राष्ट्रांत देखील दीर्घ मुदतीचें भांडवल गुंतवतांना साशंक वाटणारच.

अलीकडच्या काळांत जागतिक बँकेने दिलेलीं कर्जें हा एक परकीय भांडवल मिळविण्याचा महत्त्वाचा मार्ग झालेला आहे. उत्तरोत्तर या मार्गानें अधिकाधिक कर्ज आपल्याला मिळत आहे. या बँकेजवळ भारताची पतहि तशी चांगली आहे. आपल्या योजना व त्यांची अंमलबजावणी ही इतर अप्रगत राष्ट्रांशी तुलना करतां अधिक कार्यक्षम आहेत असा विश्वास आपण या बँकेच्या ठिकाणीं निर्माण करूं शकलो आहोत. १९५४ व १९५५ मध्यें मिळून या बँकेकडून आपल्याला जवळ जवळ तीन कोटी रुपये कर्जाऊ मिळाले. १९५६ मध्यें ही रक्कम १२ कोटीच्या थोडीवर होती. १९५७ मध्यें या रकमेचा आंकडा ३२ कोटी रुपयांचा होता. या मदतीच्या जोडीलाच नुकत्याच कांहीं दिवसापूर्वी स्थापन झालेल्या व जागतिक बँकेशी संलग्न असणाऱ्या IDA ( International Developmental Authority – आंतरराष्ट्रीय विकास संस्था ) या संस्थेकडून मिळणाऱ्या कर्जाची मदतहि त्या संस्थेचें कार्य सुरूं झाल्यानंतर मिळूं लागेल.

परंतु आंतरराष्ट्रीय आर्थिक संस्थाकडून मदत मिळाली तरी तिलाहि मर्यादा राहते. कारण या संस्थांचें भांडवल तसें मोठें वाटलें तरी जगांतील सर्व राष्ट्रांच्या विकासाच्या गरजेच्या मानानें फार अपुरेंच पडतें. यामुळेंच परकीय सरकारकडून कर्ज किंवा मदत या स्वरूपांत भांडवल मिळाल्याखेरीज आपली परकीय भांडवलाची गरज नीटपणें भागण्याची शक्यताच निर्माण होऊं शकत नाहीं.

१९५८ मध्यें वेगवेगळया सरकारकडून व सरकारांकडे आपलें येणें देणें किती होतें याचे आंकडे पाहिले असतां याविषयींची कल्पना येऊं शकेल.

परकीय सरकारांकडून आपल्याला मिळालेल्या कर्जाचे १९५८ अखेरचे आंकडे खालीलप्रमाणें होते.

| | |
|---|---|
| ब्रिटन | ५० कोटी रुपये |
| U. S. A | ३०६ ,, ,, |
| जागतिक बँक & I M. F | १६२ कोटी |
| पश्चिम जर्मनी | २० कोटी |
| रशिया | ५३ कोटी |
| पाकिस्तान | ३६ कोटी |
| इतर देश | २५ कोटी |
| एकूण | ६५२ कोटी! |

याचवेळीं परकीय सरकारकडून भारत सरकारला येणें असावयाच्या रकमा खालीलप्रमाणें होत्या.

| | |
|---|---|
| ब्रिटन | : २१५ कोटी रुपये |
| U. S. A. | : ३२ ,, |
| पाकिस्तान | : ३०१ ,, |
| इतर देश | : ४४ ,, |

या येणें रकमापैकीं ब्रिटनमधील रक्कम हा आपला उरलेला पौन्डी गंगाजळींतील सांठा आहे. पाकिस्तानकडील तीनशे कोटी रुपयांची रक्कम आज अनेक वर्षें तशीच नोंद करून राहिलेली आहे हें आपल्याला माहीत आहे. तिचें भवितव्य आपण जाणतोंच.

परकीय सरकारकडून आलेला महत्त्वाचा भाग अमेरिकेकडून आलेला आहे ही वस्तुस्थिति आहे. बाहेरच्या अप्रगत राष्ट्रांना मदत करण्याचें अमेरिकेचें धोरण अधिक सढळ होऊं पहात आहे. कांहीं मदत आपल्याला रशियाकडूनहि मिळालेली आहे. परंतु अशा मदतीचा प्रवाह हा अनेकदां आंतरराष्ट्रीय राजकीय परिस्थितीवर अवलंबून असतो आणि म्हणूनच आपलें स्वतंत्र परराष्ट्रीय धोरण ठेवूं पाहणाऱ्या भारतासारख्या राष्ट्राला ही मदत योग्य त्या प्रमाणांत हमखास मिळत राहीलच असा विश्वास बाळगतां येत नाहीं. यामुळेंच दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपुरता हा प्रश्न सुटलेला असला तरी तिसऱ्या योजनेविषयींची काळजी शिल्लक राहतेच.

परकीय भांडवलाचें महत्त्व व तें मिळविण्यांत येणाऱ्या अडचणी यांचा विचार वर केला. योजनेसाठीं लागणारें इतर भांडवल अंतर्गत प्रयत्नांनीं उभें करावें लागतें. तिसऱ्या योजनेच्या काळांत या प्रयत्नाचें स्वरूप काय राहील याचा विचार आतां करूं.

अंतर्गत भांडवल उभारणीविषयीं विचार करतांना नियोजनाकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोण लक्षांत घ्यावा लागतो. आपल्या किमान कोणत्या गरजा पूर्ण करणें आवश्यक आहे अशा विचारांतूनच आपण नियोजनाचें आकारमान ठरवतों हें आपण पाहिलें आहे. याचाच दुसरा अर्थ युद्धकाळांत ज्याप्रमाणें काय शक्य आहे यापेक्षांहि काय आवश्यक आहे याचा विचार करून सरकार आपलें खर्चाच प्रमाण ठरवतें. त्याच प्रमाणें योजनेकडे पहाण्याचीहि दृष्टि असावी असा होतो. हें ठरलें की अप्रगत दरिद्री राष्ट्रांत योजना केवळ भांडवलसंचयाच्या नेहमीच्या पद्धतीनें (उत्पन्नापेक्षां उपभोग कमी करून – जीवनमान खालीं ठेवावयास तयार होऊन) पार पाडतां येणार नाहीं; ती पुरी करण्यासाठीं कांहीं प्रमाणांत तुटीचा अर्थभरणा करून (deficit financing) या भरण्यासाठीं करावी लागणारी चलनवाढ स्वीकारली पाहिजे अशी भूमिका घ्यावी लागते. या चलनवाढीचा योग्य वापर केला तर उत्पादनवाढ होते व उत्पादनवाढ झाली तर चलनवाढीमुळें भाववाढ होण्याचें कारण उरत नाहीं. कारण चलनवाढीमुळें लोकांच्या हातांत अधिक पैसा येऊन ज्याप्रमाणें त्यांची बाजारांतील मागणी वाढलेली असते त्याचप्रमाणें उत्पादन वाढल्यामुळें बाजारांत विक्रीसाठीं येणाऱ्या वस्तूंचा पुरवठाहि वाढलेला असतो. मागणी बरोबरच पुरवठाहि वाढलेला असेल तर भाव वाढण्याचें कारण










अनुक्रमणिका

उरत नाहीं. चलनवाढीमुळें उत्पादन वाढेल व तें उत्पादन संतत गतीनें बाजारांत येईल अशी दक्षता मात्र सरकारला घ्यावी लागते. ही दक्षताहि उणी पडली तरी भाव वर चढूं लागतात. सरकारजवळ कार्यक्षम नियंत्रणयंत्रणा असेल तर ही परिस्थितिहि काबूंत ठेवतां येते. परंतु हा राज्यकारभाराच्या कार्यक्षमतेचा प्रश्न होतो. आपल्या सरकारजवळ अशी यंत्रणा नाहीं व ही कार्यक्षमताहि नाहीं असा टीकाकारांचा एक महत्त्वाचा आक्षेप आहे.

पहिल्या व दुसऱ्या योजनांतून सरकारी अर्थक्षेत्रासाठी अंतर्गत भांडवल कोणत्या पद्धतीनें उभें केलें गेलें व जात आहे हें पाहिलें असतां तिसऱ्या योजनेच्या तपशीलाचा अधिक विचार करतां येईल. याविषयींचे आंकडे पुढीलप्रमाणें :

( आंकडे कोटी रुपयांचे )

| | प. योजना | दु. योजना |
|---|---|---|
| अधिक कर व रेल्वे नफा | ७५२ | १०३० |
| कर्जें व अल्पबचत योजना | ५०९ | १०४० |
| इतर कांहीं भांडवली रकमा | ९१ | ३० |
| परकीय मदत | १८८ | ११०० |
| तुटीचा अर्थभरणा | ४२० | १२०० |
| एकूण | १९६० | ४४०० |

( अजमासे )

यापैकीं पहिल्या पंचवार्षिक योजनेचे आंकडे प्रत्यक्ष निश्चित गोळा झालेल्या रकमांचे आहेत. दुसऱ्या योजनेचे आंकडे अर्थातच कांहींसे आतापर्यंतच्या अनुभवावर आधारलेले अजमासाचे आहेत. मूळ योजनांतील आराखड्याहून हे आंकडे साहजिकच वेगळे आहेत.

तिसरी पंचवार्षिक योजना सुमारें दहा हजार कोटी रुपयांच्या आकाराची होईल असें मानलें व यापैकीं सरकारी अर्थक्षेत्र सुमारें दोनतृतीयांश असेल असें समजलें तर सरकारी अर्थक्षेत्रांत जवळजवळ ६६०० कोटी रुपये उभे करण्याची जबाबदारी येऊन पडते. ही रक्कम कशी उभी करावयाची हें प्रत्यक्षांत काय ठरेल हें आज सांगता येणार नाहीं. परंतु आजवर वेगवेगळ्या तज्ज्ञानी व संघटनानी केलेल्या कल्पनांच्या आधारें एक स्थूल रूपरेखा आपल्याला काढतां येईल. ही रक्कम अशी उभी करण्याचा प्रयत्न करतां येईल.

( आंकडे कोटी रुपायांचे )

| | |
|---|---|
| कर आकारणींतून शिल्लक | ११०० |
| रेल्वे नफा | ६०० |
| कर्जें व अल्पबचत | ११०० |
| इतर भांडवली रकमा | २०० |
| सरकारी उद्योगांतून नफा | ४५० |
| परकीय मदत | १५०० |
| तुटीचा अर्थभरणा | १३०० |
| इतर मार्गांनीं | ३५० |
| एकूण | ६६०० कोटी रुपये |

हे आकडे खूपच ढोबळ आहेत. परंतु प्रयत्नाचें प्रमाण दाखविण्यास ते पुरेसे आहेत. यापैकीं परकीय मदतीविषयींची परिस्थिति आपण पाहिली आहे. तुटीचा अर्थभरणा कां आवश्यक होतो हेंहि आपण पाहिलें आहे. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत ४२० कोटीचा तुटीचा अर्थभरणा आपण पचवूं शकलों. दुसऱ्या योजनेच्या काळांत भाववाढ आपल्याला ताब्यात ठेवता आली नाहीं. परंतु ही भाववाढ तुटीच्या अर्थभरण्यामुळें झालेल्या चलनवाढीमुळें झालेली नसून मुख्यत्वेंकरून अन्नधान्याच्या व आयातनिर्यातीच्या धोरणांत आपण केलेल्या गोंधळामुळें निर्माण झाली असें कांहीं अर्थशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. या पार्श्वभूमीवर तिसऱ्या योजनेंतील तुटीच्या अर्थभरण्याचा विचार करावा लागेल. शेवटीं या बाबतींत उत्पादनांची कार्यक्षम गतिमानता आपण किती कायम ठेवूं शकतो हाच महत्त्वाचा प्रश्न होतो. उत्पादनवाढ व चलनवाढ यांच्यांतील समतोल आपण राखूं शकलो नाहीं तर चलनवाढ थांबवून



अनुक्रमणिका

त्याप्रमाणांत योजनेचा आकार कमी करणें अपरिहार्य असतें. कारण केवळ भाववाढ होणें एवढाच एक दुष्परिणाम यांतून निर्माण होत नाहीं. या भाववाढीचा परिणाम म्हणून व्यापारीवर्ग, कारखानदार वर्ग हा अधिक श्रीमंत होतो व बांधीव उत्पन्नाच्या पगारी लोकांवर व मजुरांवर मात्र या भाववाढीचा विपरीत परिणाम होतो. श्रीमंत अधिक श्रीमंत होतात व मध्यम व गरीब वर्गाची स्थिति खालावते. संपत्तीच्या विभाजनांतील विषमता कमी होण्याऐवजी उलट वाढूं लागते. किंमती चढतात तसा योजनेंतील कामावरचा खर्चहि वाढूं लागतो व तिची मूळ आंखणी धोक्यांत येते हा आणखी एक महत्त्वाचा तोटा आहे.

परकीय मदत व तुटीचा अर्थभरणा हा भाग बाजूला काढला कीं उरलेलें सरकारी क्षेत्रांतील सर्व भांडवल जनतेनें केलेल्या बचतींतून उभें व्हावयाचें असतें. यासाठीं जनतेनें अधिक कर द्यावयास तयार झालें पाहिजे, कर्ज म्हणून मोठ्या रकमांनीं किंवा अल्पबचत योजनेंतून लहान लहान रकमांनीं सरकारच्या हातीं पैसा पुरवला पाहिजे, व रेल्वे किंवा इतर सरकारी उद्योगधंदे यांच्या मालाचे दर वाढविण्यास सहकार्य दाखवून त्या मार्गानें नफ्याच्या रूपानें सरकारला भांडवल संचय करूं दिला पाहिजे. जनतेनें विनामूल्य किंवा अल्पमूल्य घेऊन आपली श्रमशक्ति नवनिर्मितीच्या कारणासाठीं वापरली ( रस्ते, विहिरी, वृक्षसंगोपन, छोटीं घरणें इत्यादि ) तरीहि भांडवल निर्माण होऊं शकतें. या सर्व प्रयत्नांतच जनतेची आणि सरकारची कसोटी लागत असते.

पहिल्या योजनेच्या काळांत हा प्रयत्न १३५२ कोटी रुपयांचा झाला. ( एकूण अंतर्गत भांडवल उभारणींतून परकीय मदत व तुटीचा अर्थभरणा यांच्या रकमा बाजूला काढल्यानंतर हा आकडा येतो. ) दुसऱ्या योजनेच्या काळांत हा प्रयत्न २१०० कोटी रुपये इतक्या आकाराचा होईल अशी अपेक्षा आहे. तिसऱ्या योजनेच्या काळांत हा प्रयत्न आपल्या स्थूल मांडणीप्रमाणें ३८०० कोटी रुपयांचा असावा लागेल. दुसऱ्या योजनेच्या काळांत आवश्यक ती रक्कम उभी करणें किती जिकीरीचें होत आहे हें पाहिलें कीं तिसऱ्या योजनेच्या काळांत केवढा प्रचंड प्रयत्न करावा लागेल हें लक्षांत येईल.

आपली आजची मिश्र अर्थव्यवस्था चालूं ठेवावयाची असेल तर भांडवलदार वर्गावर अधिक कर लादण्याची शक्यता यापुढें कमी आहे हें आपण ओळखलें पाहिजे. परंतु कराचें प्रमाण तेंच ठेवलें तरी करवसुली कसोशीनें करून त्या करापासून मिळणारें उत्पन्न सरकारला वाढवितां येईल. भारतांत दरवर्षी सुमारें १५० कोटी ते ३०० कोटींच्या दरम्यान प्राप्तिकर चुकविला जातो असे तज्ज्ञांचे अंदाज आहेत. हे अंदाज कितपत बरोबर आहेत हें कुणालाच सांगतां येणार नाहीं. परंतु करवसुली अधिक नीटपणें केली असतां करापासूनचें उत्पादन वाढूं शकेल याबद्दल दुमत नाहीं. अशा ठिकाणीं सरकारच्या कार्यक्षमतेचा प्रश्न येतो. आणि कितीहि आशावादी भूमिका घेतली तरी गेल्या बारा वर्षांत जें साधलें नाहीं तें सरकार पुढील पांचसात वर्षांत साध्य करूं शकेल असें मानणें थोडें अवघड वाटतें. सरकारकडे आलेल्या उत्पन्नांतील खर्च करतांना होणारी उधळपट्टी किंवा गैरवाजवी खर्च थांबला तरीहि कमी पैशांत अधिक कामें करून घेतां येतील. परंतु येथेंहि तोच कार्यक्षमतेचा प्रश्न पुढें येऊन उभा राहतो.

परंतु कार्यक्षम करवसुलीनें कांहीं उत्पन्न वाढलें व अनाठायी होणाऱ्या खर्चांतहि काटकसर करतां आली तरी आपला प्रश्न पूर्णपणें सुटत नाहीं. लोकांनीं अधिक कर वगैरे द्यावयास तयार झालें पाहिजे, व अन्य बचत करूनहि पैसा सरकारच्या हातीं दिला पाहिजे. याखेरीज दुसरा मार्ग उपलब्ध नाहीं. युद्धकाळांत लोक असें करतात कारण त्यावेळीं भावनेचें भडक आवाहन असतें. साम्यवादी अप्रगत राष्ट्रेंहि राष्ट्रीय विकासासाठी राष्ट्राच्या उत्पन्नाचा जवळजवळ पंच-










चीस टक्के उत्पन्न वापरतात, आपल्या राष्ट्रांत तिसरी १०००० कोटीची योजना आपण पूर्ण केली तरीहि राष्ट्रीय उत्पन्नाशीं आपल्या बचतीचें प्रमाण केवळ १४ टक्क्यांच्या आसपास राहील. परंतु साम्यवादी राष्ट्रांतील राज्ययंत्रणा वेगळी असते. हुकूमशाही आपल्या धोरणाचे अनेक आग्रह जनतेवर लादूं शकते. लोकशाही सरकारला तसें जमूं शकत नाहीं.

तिसऱ्या पंचवार्षिक योजनेविषयीं उत्साहानें बोलतांनादेखील यामुळेंच सर्वांच्या मनांत ही शंका सलत असते. कारण हें होऊं शकेल कीं नाहीं याचें निश्चित उत्तर आज कुणाजवळच नाहीं. भांडवलदार वर्गावर अधिक कर लादण्याची परसीमा आपण गांठली आहे असें म्हटलें कीं हा सर्व अधिक भार मध्यमवर्ग व कनिष्ठवर्गाच्यावरच पडणार हें उघड आहे. नियोजनामुळें राष्ट्रीय उत्पन्न वाढलें खरें परंतु प्रत्यक्ष आपल्या जीवनमानांत कांहीं फरक झालेला आहे असा प्रत्यय या वर्गांना आलेला नाहीं. धान्यादि वस्तूंचे भाव वाढल्यामुळें हे वर्ग अधिकच संत्रस्त झालेले आहेत. विकासाच्या काळांत असें कांहीं मूल्य द्यावेंच लागतें असें या वर्गांना पटवून देऊन या वर्गांचें उत्स्फूर्त सहकार्य मोठ्या आकाराची योजना पार पाडण्यासाठीं मिळवितां येईल काय ? तसें सहकार्य देण्याची जनतेची तयारी असेल तर प्रत्यक्षांत कोणते कर वाढवावेत, सरकारी कारखान्यांतील मालाच्या किंमती किती वर चढवाव्यात, रेल्वेचे दर किती

वर न्यावेत, अल्पबचत रकमा, कर्जें कोणत्या सोयी-स्कर मार्गानी गोळा करावींत हे सारे केवळ योग्य तपशीलाचे प्रश्न होऊन बसतात. तिसऱ्या योजनेच्या काळांत यामुळेंच आपल्या राजकीय कर्तृत्वाची नियोजनाच्या कालखंडांतील पहिली खरी कसोटी लागणार आहे. हें कर्तृत्व अपुरें पडलें तर भांडवल उभारणी अपुरी होईल, योजना आखडती घ्यावी लागेल, उत्पादनवाढीची गति कायम राखतां येणार नाहीं व वाढत्या लोकसंख्येपुढें सरासरी जीवनमान टिकवितांना हार खाण्याचा प्रसंग येईल. या परा-भवाचे परिणाम जनतेच्या मनावर काय होतील हें कोण सांगू शकेल ?

या वरील विवेचनांत खाजगी अर्थक्षेत्राचा विचार आपण केलेला नाहीं. १९४८ व १९५६ मध्यें सरकारनें जाहीर केलेल्या औद्योगिक धोरणाप्रमाणें ( Industrial Policy Statement ) कोणते उद्योगधंदे कोणत्या अर्थक्षेत्रांत राहतील याचा निर्देश करण्यांत आलेला आहे. शेतीव्यवसाय, छोटे उद्योगधंदे हे खाजगी अर्थ-क्षेत्रांतच आहेत व राहतील. खाजगी व सरकारी अर्थक्षेत्राच्या विभागणीचा आपण विचार करतो त्यावेळीं सामान्यपणें तो मोठ्या उद्योगधंद्यांना उद्देशून असतो. आपल्या सध्याच्या धोरणाप्रमाणें ग्राहकोपयोगी वस्तूंच्या उत्पादनांत ( consumer's goods – कापड वगैरे ) खाजगी उद्योगधंद्यांना वाव राहील. मूलभूत महत्त्वाचे उद्योगधंदे ( basic industries ) सरकारी अर्थक्षेत्रांत रहातील. ग्राहकोपयोगी वस्तूंचे कारखाने वाढवितांनाहि त्याचा छोट्या उद्योगधंद्यातील बेकारी वाढण्याच्या दिशेनें काय परिणाम होइल हें पाहिलें जातें. मोठ्या कार-खान्यांतील अधिक उत्पादन निर्यातीसाठीं होत असेल तर तशा उत्पादनालाहि सवलत देण्यांत येते.

खाजगी अर्थक्षेत्र भारतांत आज एका विचित्र अवस्थेंत आहे. त्याचें निश्चित स्थान, त्याच्या मर्यादा या स्पष्ट झालेल्या नाहींत. आर्थिक व राजकीय व्यवहारांत खाजगी भांडवलदारांचा वर्ग दडपण आणूं शकतो ही गोष्ट खरी असली तरी प्रत्येक वेळीं आपलें ईप्सित साध्य करण्यांत तो यशस्वी होतोच असें नाहीं. सरकारचें धोरण प्रत्येक वेळीं नीट निश्चित-पणें ठरत नाहीं व ठरलें तरी नीटपणें अनेकदा अंमलात आणलें जात नाहीं ही यांतील मुख्य अडचण आहे. करविषयक धोरण व करवसुलीची कार्यक्षमता, आयात निर्यात धोरण व प्रत्यक्ष परवाना पद्धतीचा व्यवहार, विविध नियंत्रणांचा अनुभव, अन्नधान्य व्यापार सरकारनें हातीं घेतल्याविषयींचा अनुभव अशा सर्व गोष्टींतून या अडचणी प्रत्ययास येतात. प्रत्येक धोरणाच्या युक्तायुक्ततेचा तपशीलवार विचार बाजूला ठेवला तरी धोरण आंखतानाची व अंमलात आणतेवेळेची ही अस्थिरता व अनिश्चितता हानिकारकच ठरते. धोरणाच्या व यंत्रणेच्या कमकुवतपणापासून मिळेल तेवढा फायदा मिळेल त्या मार्गानीं त्या त्या वेळीं मिळवावा अशी खाजगी भांडवलदारांची वृत्ति राहते. ही वृत्ति खाजगी अर्थक्षेत्रालाहि हितावह नाहीं किंवा एकूण राष्ट्राच्या आर्थिक व्यवस्थेलाहि हिताची नाहीं.

खाजगी अर्थक्षेत्राचें नेमकें स्थान कोणतें असावें याविषयीं यामुळेंच आज वादविवाद आढळून येतात. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या काळांत सरकारी व खाजगी अर्थक्षेत्रांच्या विकासाला जवळजवळ सारखा वाव ठेवण्यांत आलेला होता. दुसऱ्या योजनेच्या आंखणींत हें प्रमाण सरकारी अर्थक्षेत्र व खाजगी अर्थक्षेत्र यांच्यामध्यें ६१:३९ असें करण्यांत आलें. [ सरकारी अर्थक्षेत्रांतील प्रत्यक्ष उत्पादक भांडवल खर्च तेवढाच तुलनेसाठीं घेण्यांत येतो. ( शिक्षण आदिवरील खर्च वगळून ) पहिल्या योजनेंत ही रक्कम १५००कोटी रुपये होती. तर दुसऱ्या योजनेच्या आंख-णीत ही रक्कम ३८०० कोटी रुपये होती ] प्रत्यक्षांत सरकारी अर्थक्षेत्रांतील गुंतवण अपेक्षेपेक्षां कमी होईल








असा रंग दिसत असल्यामुळें शेवटीं हें प्रमाण खाजगी अर्थक्षेत्राला ३९ टक्क्यांहून कांहींसें अधिक राहील. तिसऱ्या योजनेच्या काळांत सरकारी अर्थक्षेत्राचें प्रमाण वाढविण्याऐवजीं कांहीं कमी करावें व ५५:४५ असें प्रमाण स्वीकारावें अशी भूमिका Federation of Chamber of Commerce and Industry या संघटनेनें मांडली आहे. म्हणजे सुमारें ४५०० कोटी रुपयांची भांडवलउभारणी खाजगी अर्थक्षेत्रांत व्हावी लागेल. यासाठींच परकीय खाजगी भांडवलाला सवलती देऊन भारतांत येण्याचें आवाहन करावें व याहूनहि भारतांतील खाजगी भांडवलदार व कंपन्या यांचेवरील विविध कर कमी करावेत, त्याना जाचणारीं नियंत्रणें काढून टाकावींत व सरकारनें आपला दृष्टिकोन विरोधाचा ठेवण्याऐवजीं सामान्यतः सहानुभूतीचा ठेवावा असें फेडरेशननें सुचवलें आहे. असें झालें तर ४५०० कोटीची भांडवल गुंतवण खाजगी अर्थक्षेत्रांत तिसऱ्या योजनेच्या काळांत होऊं शकेल असा फेडरेशनला विश्वास आहे.

खाजगी अर्थक्षेत्रांत किती नवें भांडवल गुंतवलें जातें व तें कोठून येतें याचा अभ्यास रिझर्व्ह बॅंक करण्याचा प्रयत्न करीत आहे. परंतु अद्याप पूर्ण तपशीलवार माहिती या दृष्टीनें गोळा झालेली नाहीं. फेडरेशननें आपल्या तिसऱ्या योजनेच्या आराखड्यांत खाजगी क्षेत्रांतील भांडवल कसें उभें करतां येईल याचा स्थूल तपशील दिलेला आहे. परंतु त्यासाठीं करादिक गोष्टींत फेडरेशनला हव्या असलेल्या सवलती इतक्या आहेत कीं प्रत्यक्षांत त्या सवलती मिळण्याची शक्यता नाहींच असें म्हटलें तरी चालेल.

खाजगी भांडवलदारांच्या प्रतिनिधींशीं बोलतांना व त्याचप्रमाणें A. I. C. C. समोर भाषण करतांना पं. नेहरूंनी सरकारचें धोरण स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. उत्पादनाच्या क्षेत्रांत खाजगी भांडवलदारांना स्थान आहे ही वस्तुस्थिति त्याना मान्य आहे. ही वस्तुस्थिति अनिष्टच आहे असें ते मानीत नाहींत. ती इष्ट कीं अनिष्ट हें खाजगी भांडवलदार समाजहिताची दृष्टि आपल्या व्यवहारांत कितपत ठेवतात यावर अवलंबून राहील. म्हणून सरकार याबाबतींत कोणतीहि ठोकळेबाज भूमिका घेऊं इच्छित नाहीं. प्रत्यक्ष व्यावहारिक परिस्थितीला अनुरूप अशीं पावलें वेळोवेळीं टाकलीं जातील.

या भूमिकेंत तत्त्वत: चूक कांहीं नाहीं. किंबहुना ती भूमिका तात्त्विक म्हणण्यापेक्षां मुख्यत्वें करून व्यावहारिकच आहे. परंतु व्यवहारांतच तपशील ठरवितांना बिकट प्रश्न निर्माण होत असतात. पहिल्या दोन योजनापेक्षा तिसरी योजना अनेक दृष्टीनी अधिक महत्त्वाची ठरणार आहे. आपल्या अर्थव्यवस्थेला शेवटी कोणतें वळण लागणार आहे, आपल्या विकासाची अंतिम दिशा व गति काय राहतील या गोष्टी या योजनेच्या काळांतच प्रामुख्यानें ठरतील. पहिल्या दोन योजनानी आंखून दिलेलीं धोरणें योग्य होतीं असेंच आपण सामान्यपणें मानतों. प्रश्न आहे तो तीं धोरणें कणखरपणें व कुशलतेनें कार्यवाहींत आणण्याचा.

निश्चित धोरण आंखणें व तें पार पाडणें याचें महत्त्व खाजगी अर्थक्षेत्रांतील भांडवल उभारणीच्या दृष्टीनें आहे तसें सरकारी अर्थक्षेत्रांतील भांडवल उभारणीच्या दृष्टीनेंहि आहे. सरकारी अर्थक्षेत्रांत अपेक्षित भांडवल उभारणी व्हावयाची असेल तर जनतेचें उत्स्फूर्त सहकार्य सरकारला मिळणें आवश्यक आहे हें आपण पाहिलें. हें सहकार्य निश्चितपणें मिळविण्याचा कोणताहि रामबाण तोडगा नाहीं. परंतु या सहकार्याची शक्यता निर्माण व्हावयाची असेल तर कांहीं किमान गोष्टी तरी आधीं साध्य झाल्या पाहिजेत.

(१) नियोजनाच्या काळांत सर्वांवरच कांहीं अधिक ताण पडणार याची जाणीव.

(२) दरिद्री देशांत आर्थिक विषमता नाहीशी करण्याइतकेंच किंबहुना कांहींसें अधिक महत्त्व एकूण आर्थिक उत्पादन वाढविण्याच्या प्रयत्नाला असतें याची जाणीव.

(३) सरकारच्या कार्यक्षमतेवर विश्वास.

(४) आर्थिक विषमता फार कमी झाली नाहीं तरी निदान ती अधिक वाढणार नाहीं याविषयीं दक्षता घेतली जात आहे असा विश्वास.

यांतील कांहीं गोष्टींसाठीं भावनेला आवाहन करणें आवश्यक होईल. परंतु कांहीं गोष्टीसाठीं नेहमींच्या व्यवहारांतच दक्षता घ्यावी लागेल. आर्थिक विषमतेचें प्रमाण वाढूं न देणें ही यापैकीं एक गोष्ट झाली.

समाजवादी समाजरचनेचें ध्येय काँग्रेसनें घोषित केलें आहे. आपल्या राज्यघटनेनेंहि आर्थिक विषमता कमी करण्याच्या सूत्राचा उल्लेख केलेला आहे. तिसऱ्या योजनेची वाटचालहि समाजवादी समाजरचनेच्या दिशेनेंच व्हावयाची आहे. (फेडरेशन खाजगी भांडवलासाठीं अनेक सवलती मागत असतांहि या सर्व गोष्टी समाजवादी समाजरचनेला पोषकच होतील असें म्हणत आहे. फेडरेशनचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे.)

समाजवादी समाजरचना म्हणजे काय याचें निश्चित नेमकें दिग्दर्शन कोणी केलेलें नाहीं. यामुळें अनेकाना आपापल्या मनांतील अर्थानें तो शब्द वापरण्याची सवड राहते. परंतु कितीहि सैल व्याख्या केली तरी आर्थिक विषमतेचें प्रमाण उत्तरोत्तर कमी होत जाणें या गोष्टीचा समावेश निदान समाजवादी समाजरचनेंत झालाच पाहिजे. आपल्या देशांतील आर्थिक विषमता कमी होत आहे कीं नाहीं याविषयींची तपशीलवार माहिती आपल्याला उपलब्ध नाहीं. परंतु जी कांहीं माहिती उपलब्ध आहे तिच्यावरून कोणतें चित्र दिसतें ?

भिकारी, अपंग यासारखा भारतांतील दीनतम वर्ग कोणताच उत्पादक व्यवसाय करत नाहीं म्हणून बाजूला ठेवला (आणि ही संख्या खूप मोठी आहे हें आपण जाणतो) तर उत्पादक वर्गामध्यें भूहीन शेतमजूरांची स्थिति ही सर्वांत निकृष्ट आहे. या शेतमजूरांचें सरासरी वार्षिक उत्पन्न ८० ते १०० रुपयांच्या दरम्यान असतें. शेतमजूरांच्या परिस्थितीच्या केलेल्या दुसऱ्या आर्थिक पहाणीचे जे प्राथमिक निष्कर्ष आढळतात त्यावरून १९५१ ते १९५६ या दरम्यान शेतमजूरांचें सरासरी उत्पन्न सुमारें दहा टक्क्यानीं घटलें असावें. शेतमजूराच्या सरासरी उत्पनाच्या मानानें कारखान्यांत काम करणाऱ्या मजूराचें सरासरी उत्पन्न दसपटीहूनहि अधिक असतें. परंतु कारखान्यांतील मजूराची परिस्थितिहि या काळांत सुधारली असें म्हणतां येणार नाहीं. १९५१ मध्यें त्याचें सरासरी वार्षिक उत्पन्न १०३६ रुपये होतें. १९५७ मध्यें तें १२३४ रुपये होतें. या काळांतील किंमतींचा निर्देशांक १९५१ मध्यें १०५, १९५५ मध्यें ९५ व १९५७ मध्यें १११ होता, हें लक्षांत घेतलें म्हणजे या मजुरांच्या परिस्थितीत फार फरक पडला नाहीं हें लक्षांत येतें. शहरांची वाढ झाली व शहराकडे संपत्ति जात असल्याचें हें निदर्शक होतें असें मानावयास हरकत नाहीं. भांडवलदार वर्गावर, खाजगी संपत्तीवर कर आकारणीचें प्रमाण तसें अधिक होतें. प्राप्तीवरील कराचे दर अधिक प्राप्तीवर नेहमीच चढते असे असतात. १९५९–६० च्या दराप्रमाणें वार्षिक तीस लाख रुपयांची स्वकष्टार्जित (earned) मिळकत असणाऱ्या माणसाला जवळजवळ तेवीस लाख रुपये सरकारला कर म्हणून द्यावे लागतील. याखेरीज विनियोग कर (expenditure tax), संपत्ति कर (Wealth tax), अशा नवीन नवीन करांच्या दिशेनेहि आपण चाललों आहोंत. परंतु मिळकत वेगवेगळया सदराखाली किंवा कुटुंबियांच्या नांवाखालीं दाखवून किंवा लपवून ठेवून हे कर चुकविणें शक्य असल्यामुळें आर्थिक विषमतेवर त्यांचा जेवढा आघात व्हावयास

पाहिजे तेवढा होत नाहीं. विविध कारणामुळें झालेल्या भाववाढीचा फायदा श्रीमंत व्यापारी व भांडवलदार वर्गालाच मिळालेला आहे. या उलट या भाववाढीमुळें खालच्या वर्गांचें जीवनमान आणखीच खाली घटतें व विषमतेचें अंतर वाढावयास मदत होते. आज सर्वांना रोजगारीची शाश्वति नाहीं. कांहीं पूर्ण बेकार आहेत तर असंख्य अर्धबेकार ( underemployed ) आहेत. National Sample Survey नें चौथ्या व सातव्या फेरीत गोळा केलेल्या माहितीप्रमाणें काम करणाऱ्या लोकांपैकीं खेडेगांवांत केवळ ४४ टक्के लोकाना व शहरांतून ६२ टक्के लोकाना महिन्यांतून २५ दिवसाहून अधिक दिवस काम असतें. बाकीच्यांचे कमी अधिक दिवस बेकारीत जातात. अर्धबेकाराना व बेकाराना पुरेसें काम मिळणें हें आर्थिक विषमता दूर करण्यांतील फार महत्वाचें पाऊल आहे. अजून आपण तें उचललें आहे असें म्हणतां येणार नाहीं. प्रत्येक पंचवार्षिक योजनेच्या शेवटी आधींचे बेकार शिल्लक असतातच. दुसऱ्या योजनेच्या शेवटीं असे ७० लाख लोक असतील अशी अपेक्षा आहे. लोकसंख्येच्या वाढीमुळें आणखी १ कोटी ४० लक्ष नव्या मजूरांची या संख्येंत भर पडेल. म्हणजे सुमारें २ कोटी १० लक्ष लोकाना व्यवसाय पुरविण्याची जबाबदारी तिसऱ्या योजनेवर येऊन पडेल. बेकारीचें एवढें प्रचंड प्रमाण समाजवादाच्या दिशेनें आपली होणारी वाटचाल अगदीच मंद असली पाहिजे ही गोष्ट उघड दाखविते. त्यांतल्यात्यांत कांही प्रगति जर आपण केली असेल तर ती शेतीच्या क्षेत्रांत आहे. याखेरीज खाजगी अर्थक्षेत्रांत खाजगी भांडवलदारांच्या उत्पादनाच्या










साधनावरील मालकीला आपण कांहींहि धक्का लावलेला नाहीं.

जनतेच्या उत्स्फूर्त सहकार्यासाठी योग्य अशी भूमिका जर तयार करावयाची असेल तर बेकारी दूर करणें, जीवनावश्यक गोष्टींचे भाव चढणार नाहींत अशी दक्षता घेणें व देशांत वरिष्ठ वर्ग आणखीच वरिष्ठ होत आहे असा विपरित प्रत्यय जनतेला न येईल याविषयीं जागरूक राहणें या किमान गोष्टी आवश्यक आहेत. ही सहकार्याची भावना विविध राजकीय पक्षांच्या द्वारा कार्यकारी कशी होईल हाहि एक महत्त्वाचा प्रश्न होऊं शकतो. परंतु त्याचें विवेचन सध्या केलें नाहीं तरी चालूं शकेल. बाजारांत देखील तुरी नसतांना उगाच पुढचे प्रकार कशाला ?

तिसऱ्या योजनेचा तोंडावळा पहिल्या व दुसऱ्या योजनेच्या तोंडावळयाहून वेगळा असण्याचें कारण नाहीं. दुसऱ्या योजनेंत गैरसमजुतीनें शेतीविकासावरील भर कमी करण्यांत आला होता ती चूक मात्र सुधारावी लागेल. एरवी धोरण विषयक सिद्धांत आज इतके सर्वमान्य आहेत कीं त्यांचा निर्देश करून ठेवला कीं पुरेसें आहे. त्यांचें सविस्तर विवेचन करण्यांची आवश्यकता नाहीं. ते सिद्धान्त असे :

( १ ) समाजवादी समाजरचनेचें ध्येय.

( २ ) मिश्र अर्थव्यवस्था. खाजगी क्षेत्राची प्रत्यक्ष मर्यादा व्यवहाराच्या सोयीच्या दृष्टीनें ठरविली जाईल.

( ३ ) शेतीवर भर. अन्नधान्याच्या बाबतींत स्वयंपूर्ण होण्याच्या प्रयत्नाला अग्रक्रम.

( ४ ) मूलभूत महत्त्वाच्या उद्योगधंद्यांचा सरकारी अर्थक्षेत्रांत विकास.

( ५ ) ग्राहकोपयोगी वस्तूंच्या उत्पादनाचे मोठे कारखाने खाजगी अर्थक्षेत्रांत येतील. बेकारी वाढणार नाहीं व निर्यातीस उत्तेजन मिळेल अशा पद्धतीनें या कारखान्यांच्या विकासास अनुमति दिली जाईल.

( ६ ) ग्रामोद्योग व छोटे उद्योगधंदे यांचें महत्त्व. बेकारी वाढूं नये म्हणून या उद्योगांचें संरक्षण. परंतु निरंतर असें संरक्षण द्यावें लागावें अशी कल्पना नाहीं. या उद्योगांत तान्त्रिक सुधारणा करून त्यांची अर्जनशक्तिहि वाढविण्याचे प्रयत्न केले जातील.

( ७ ) परराष्ट्रीय धोरण न बदलतां परकीय मदत मिळविण्याचा प्रयत्न.

( ८ ) विकेंद्रीकरणाच्या दिशेनें वाटचाल. विकेंद्रीकरणाची आपली कल्पना अजून मुख्यत्वेंकरून मनांतच राहिली आहे. ती वस्तुस्थितीत उतरावयाची असेल तर स्थानिक व प्रादेशिक नियोजनाला अधिक मोकळेपणानें वाव द्यावा लागेल.

(९) राज्ययंत्रणेची कार्यक्षमता वाढविण्याची आवश्यकता.

(१०) जनतेचें सहकार्य.

(११) अंतर्गत भांडवल उभारणी अपुरी पडेल तेव्हां तुटीचा अर्थभरणा. परंतु अर्थभरण्याचा अर्थव्यवस्थेवर विपरीत परिणाम होत नाहीं याविषयीं दक्षता. भाववाढीवर नियंत्रण.

(१२) लोकसंख्येची वाढ थांबविण्यासाठीं प्रयत्न.

आर्थिक नियोजन हा एक राष्ट्राच्या जीवनाच्या सर्व अंगाना स्पर्श करणारा महाप्रयत्न असतो. या प्रयत्नासाठीं राष्ट्रीय जीवनांतील सर्व शक्ति एकवटावी लागते. यांत भावनेचा प्रश्न येतो, समाजरचनेचा विचार येतो, राजकारण येतें व अर्थकारण तर साहजिक तेथें असतेंच. विविध अंगांनी सारखें परिवर्तन चालूं राहणें आवश्यक असतें. व एका परिवर्तनाचा दुसऱ्या परिवर्तनाशीं तालमेळ सांभाळावा लागतो. भारताच्या पुढें हें एक आव्हान आहे. भारताच्या परंपरेंतून आलेल्या कांहीं दोषांमुळें ( उदा० दैववाद, जातिव्यवस्था ) आपला प्रश्न आधीच अवघड होता. हे दोष दूर करण्याचा प्रयत्न करावा लागेल. घटनेनें प्रत्येकाला मताचा अधिकार देऊन आपण आपलें काम कांहींसें अधिकच अवघड करून ठेवलें आहे. पुरेसा औद्योगिक विकास होण्याच्या आधींच सर्वांना मतदानाचा








अधिकार देण्यांत आला असें इतर कोणत्या राष्ट्राच्या इतिहासांत घडलेलें नाहीं. याला अडचण अशासाठीं म्हणावयाचें कीं नियोजन करतांना अनेकदां तात्कालिक अप्रिय वाटणारे निर्णय घ्यावे लागतात. ( उदा० कर वाढवणें ). थोड्याच दिवसानीं निवडणुकीसाठीं तयारी ठेवणारें सरकार जनतेच्या अंतिम हिताच्या परंतु तात्कालिक दृष्ट्या जनतेला अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी हातीं घ्यावयास किंवा हातीं घेतल्या असल्यास विरोधाला न जुमानतां तशाच चालू ठेवावयास बिचकते.

परंतु प्रत्येकाला मतदानाचा हक्क दिला याची खन्त वाटावयास नको. उलट आपल्या अशा राज्यघटनेचा अभिमानच वाटावयास पाहिजे. कारण केवळ आर्थिक विकास साधावयाचा एवढेंच आपलें मर्यादित उद्दिष्ट नाहीं. तेवढें मर्यादित ध्येय असतें तर आपला प्रश्न कितीतरी सोपा झाला असता. जनतेचें सक्तीच्या खुषीचें सहकार्य आपल्याला मिळवितां आलें असतें. इतर अडचणीहि तलवारीच्या धारेनें दूर करतां आल्या असत्या. परंतु मानवाचा विकास करण्याच्या प्रयत्नांत मूळ मानवता मात्र आपण गमावून बसलों असतों. ‘जिथें सारीं निर्भय आहेत आणि प्रत्येकाचें मस्तक सतेज उन्नत आहे’ असा भारत घडवावयाचा असेल तर आपल्याला संपूर्ण लोकशाही मार्गानेंच गेलें पाहिजे—मग आपलीं कांहीं पाऊलें कितीहि मंद व साशंक भासोत.

---

प्रा. ग. वि. अकोलकर

# जॉन ड्यूई – व्यक्ति आणि कांहीं विचार : २ :

मागील लेखांत ड्यूईंच्या शैक्षणिक विचारसरणीचा ओझरता परिचय आपण करून घेतला. शिक्षणाचा व समाजजीवनाचा घनिष्ट संबंध आहे आणि समाजजीवनाची परंपरा अखंड व अबाधित चालू राहावी, म्हणून प्रत्येक समाजांत शिक्षण-प्रक्रिया चालू असते, हें आपण पाहिलें आहे. त्या समाजाचें कोणतें स्वरूप ड्यूईंना इष्ट वाटतें हें आतां मुख्यतः पाहावयाचें आहे. 'लोकशाही समाज' हें जरी त्याचें उत्तर असलें तरी तोच समाज कां, त्याचीं लक्षणें कोणतीं, कार्यपद्धति कोणती व या बाबतींतल्या कल्पनांत ड्यूईंनीं घातलेली भर कोणती, लोकशाही समाजांत व्यक्ति व समाज यांचे संबंध कसे असतात वा असावेत, त्यांतील दंडशक्तीचा (सँक्शन) आधार कोणता इत्यादि अनेक प्रश्न उपस्थित होतात. त्यांतील कांहींचा परिचय या लेखांत करून घ्यावयाचा आहे. *

## लोकशाही समाजच कां ?

सामान्यतः व्यक्तिस्वातंत्र्य, व्यक्तीची प्रतिष्ठा आणि व्यक्तिमात्राचें पावित्र्य हीं मूल्यें स्वीकारून लोकशाही समाजाचें आदर्शत्व गृहीत धरण्यांत वा मान्य करण्यांत येतें. पण अशा कुठल्याच पूर्वगृहीत कल्पनांचा आश्रय करण्याची ड्यूईंची पद्धति नसल्यानें 'लोकशाही' हेंच समाजाचें इष्टतर स्वरूप मान्य करतांना त्यांनीं वेगळी विवेचन पद्धति स्वीकारली आहे; आणि जीवशास्त्र व उत्क्रांतिवाद यांतील कल्पनांना ती धरून असल्यानें तिला एक प्रकारचें शास्त्रीयत्व प्राप्त झालें आहे. व्यक्तीचा विकास (म्हणजे शिक्षण) ही एक सामाजिक क्रिया असल्यानें त्याचें स्वरूप समाजाच्या गुणवत्तेवर अवलंबून राहील. जे समाज परिवर्तनशील असतील इतकेंच नव्हे तर इष्ट दिशेनें परिवर्तन हें ज्या समाजांत ध्येय असेल, तेथें हा विकास चांगल्या तऱ्हेनें होत राहाणार.[1] प्रत्येक व्यक्ति ही समाजाचा घटक असतेच. पण तो समाज व्यक्तीच्या विकासाला पोषक आहे कीं नाहीं याची कसोटी कोणती ? ड्यूईंनीं त्याचीं दोन लक्षणें सांगितलीं आहेत. केवळ समान उद्दिष्टांची धारणा व घटकांतील परस्पर सहकार्य व क्रिया-प्रतिक्रिया एवढ्यानेंच समाज वा संघ श्रेष्ठ ठरत नाहीं. या गोष्टी कांहीं प्रमाणांत चोरांच्यां टोळींतहि आढळतात. तेव्हां समाज नैतिक दृष्ट्या—म्हणजे जेथें मानवाच्या बुद्धि—भावना—सौंदर्यदृष्टि यांना पोषक असें वातावरण लाभेल अशा दृष्टीनें— वरच्या पातळीवर असावयास आणखी कांहीं गोष्टींची गरज आहे. आणि त्या म्हणजे: (१) समाजांतील घटक ज्या गोष्टींत वा विषयांत जाणीवपूर्वक रस घेऊं शकतील, परस्परांच्या अनुभवांत आस्थेनें सहभागी होऊं शकतील अशा विषयांची विविधता असली पाहिजे व त्यांच्या संख्येला मर्यादाहि असतां कामा नये. (२) समाजांतील विविध गट, संस्था, यांना स्वतःच्या समाजांतीलच नव्हे तर अन्य समाजांतील गट, संस्था यांच्याशींहि देवाण-घेवाण करण्याची मोकळीक असली पाहिजे. या कसोट्या फक्त लोकशाही समाजासच लागू पडतात. व्यक्तीच्या सुप्त शक्तींचा अनिर्बंध विकास

---

* या लेखांत टीपांत उल्लेखिलेलीं प्रकरणांचीं नांवें व पृष्ठांक 'Inteligence in the modern world' या लेखसंग्रहांतील आहे. D & E हा उल्लेख Democracy & Education या ग्रंथासाठीं

१. D. & E. P. 96.








अशा लक्षणांनीं युक्त असलेल्या समाजांतच संभवतो, हें स्पष्ट आहे. 'लोकशाही म्हणजे व्यक्तीच्या ठायीं विकासाचें सामर्थ्य आहे अशी निष्ठा' – आणि या निष्ठेचा आधार जीवशास्त्रानें सिद्ध केलेली सजीवाची सप्रयोजन वागणूक (Perposive behaviour)

आपण सारेच लोकशाहीची भाषा बोलतों, पण प्रत्येकाच्या ठिकाणीं कांहीं सामर्थ्य, कांहीं बुद्धि आहे तिलाहि वाव दिला पाहिजे याला मात्र आपली तयारी नसते. 'तुम्हांला कळत नाहीं', 'त्याला आपलें हित समजत नाहीं', 'मजवर सोंपवा', 'त्यांच्यावर मार्ग, युक्ति काढायचें सोपवा', अशी जेव्हां भाषा सुरू होते, कुणातरी व्यक्तीला सर्व विवेकशक्तीचे विश्वस्त वा मक्तेदार मानण्यांत येतें, तेव्हां तेथें लोकशाही संपुष्टांत येते, ही गोष्ट आपल्या लक्षांत येत नाहीं, हें लोकशाहीचें मोठें दुर्दैव व तिच्या विकासाच्या मार्गांतला मोठा धोका आहे.

'लोकशाही' चा संबंध संपूर्ण व्यक्तीविकासाशीं आहे हें लक्षांत घेतल्यानंतर लोकशाही ही केवळ राज्य-व्यवस्थेचें एक रूप नव्हे ही गोष्ट ओघांतच येते. म्हणून लोकशाही केवळ राजकीय नसते, अर्थकारणांत नसते, केवळ सामाजिक नसते, – वा या सर्वांची गोळा बेरीजहि नसते. ती एक जीवनदृष्टि वा जीवननिष्ठा विशिष्ट तऱ्हेनें जीवन व्यतीत करण्याची पद्धति (वे ऑफ लाईफ) ठरते. गीतेच्या स्थितप्रज्ञाप्रमाणें जीवनांतील सर्व प्रश्न – मग ते घरगुतीसंबंधांतील असोत, व्यावसायिक क्षेत्रांतील असोत, वा अंतर्राष्ट्रीय संबंधांतील असोत. – 'एका विशिष्ट पद्धतीनेंच लोकशाहीचा उपासक पाहील आणि सोडवील. "मानवांच्या परस्पर संबंधाच्या आणि व्यक्तिमत्त्वाच्या विशाल क्षेत्रांत जीं उद्दिष्टें आहेत, तीं प्राप्त करून घेण्याचें आतांपर्यंत उपलब्ध साधनांतील राजकीय लोकशाही हें एक उत्कृष्टतम साधन आहे" हें ध्यानांत धरलें पाहिजे.

लोकशाही निष्ठा ही सामाजिक व वैयक्तिक जीवनाची एक पद्धति आहे. एवढें सांगून पुरें होत नाहीं. तिचें स्वरूप अधिक स्पष्ट व्हावयाला हवें. ड्यूईच्या मतें या निष्ठेचा आशय, तिचें मुख्य लक्षण हें आहे कीं, व्यक्ति ज्या ज्या समाजाचा घटक असेल त्या समाजाचें नियंत्रण करणारीं जीं मूल्यें ठरविलीं जातील, त्या मूल्यांची निश्चिति करतांना त्यांत त्या प्रौढ व्यक्तीला सहभागी होतां आलें पाहिजे.[2] ("The necessity for the participation of every mature human being in formation of the values, that regulate living of men together) कुणाहि एका सज्जनाला वा एखाद्या सज्जन-वृंदाला दुसऱ्यावर त्याच्या संमतिविना हुकमत गाजवितां येणार नाहीं-याचा अर्थ असा कीं, ज्या सामाजिक संस्थांचा व्यक्तींवर परिणाम होत असेल, त्या संस्थाच्या निर्मितींत, संचलयांत त्या संबंधित व्यक्तींना संस्थेचें उद्दिष्ट कार्य पद्धति इ. ठरविण्याचा अधिकार वा संधि असली पाहिजे.

व्यक्तीला ती ज्या समाजाचा घटक असेल त्यांत सर्वांशानें सहभागी होतां आलें पाहिजे, तिच्यांत व अल्प घटकांत अनुभवाचें आदान-प्रदान झालें पाहिजे, या गोष्टीवर ड्यूईचा विशेष रोख आहे. याला अनेक कारणें आहेत. नैतिक दृष्ट्या त्यांचें म्हणणें समजण्यासारखें आहे. जेव्हां व्यक्तीला एखाद्या कृत्याच्या परिणामाबद्दल जबाबदार धरण्यांत येतें, तेव्हां तें कृत्य तिनें स्वतः कांहीं विशिष्ट उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून केलें, त्याचीं साधनें निवडलीं, आणि त्या कृत्याच्या परिणामाची तिला कल्पना, दूरदृष्टि होती–निदान हें सर्व समजण्याचें व करण्याचें तिला स्वातंत्र्य होतें, असें गृहीत धरलें जातें. अशा तऱ्हेचें स्वातंत्र्य नसेल, व्यक्ति जर दुसऱ्यानें कुणी तरी निश्चित केलेल्या ध्येय-उद्दिष्टाप्रमाणें

2. The Democratic Form p. 400.








वागत असेल, तर तिचें स्थान गुलामापेक्षां वेगळें नव्हे; अनुभव निवेदनाचें ( communication ) किंवा त्यांत सहभागी होण्याचें ( participation ) स्वातंत्र्य हा या दृष्टीनें लोकशाहीचा गाभाच ठरतो. तसें स्वातंत्र्य नसणें म्हणजे व्यक्तीवर होणारा जुलूम व जबरदस्तीच आहे, जुलुमाचा हा एक सूक्ष्म प्रकार आहे, असें ड्यूईंचें स्पष्ट मत आहे. म्हणून ते म्हणतात : " The very fact of exclusion from participation is a subtle form of suppression. This form of suppression and coercion is more subtle and more effective than are overt intimidation and restraint. "[3] – व्यक्तीला अशा तऱ्हेनें वगळण्याचा व डावलण्याचा हा जो जुलुमाचा प्रकार आहे तो उघड धमक्या व अटकाव यापेक्षां अधिक सूक्ष्म व अधिक परिणामकारकहि आहे.

## साध्यसाधन संबंध

ड्युईंच्या दृष्टीनें या सहजीवनांतर्गत सहानुभवाला आणखी एक वेगळेंच महत्त्व आहे. ते ' साधना'च्या दृष्टीनें साध्य-साधनाबाबत सत्याग्रह–तत्त्वज्ञानाच्या निमित्तानें आपल्याकडे खूपच चर्चा झाली आहे व अल्डूस हक्सेनें प्रतिपादिलेला सिद्धांत ( Good ends cannof be achieved by inappropriate means ) आपल्याकडे सामाजिक व राजकीय क्षेत्रांत आतां मान्य झाला आहे. स्वातंत्र्य व लोकशाही याबद्दल लिहितांना हक्स्लेनें हाच सिद्धान्त आधाराला घेतला असून शिक्षणक्षेत्रांत लोकशाही निष्ठा निर्माण करण्यासाठीं त्याचें महत्त्व विवेचिलें आहे. हक्स्लेचें म्हणणें असें आहे कीं, " If your goal is liberty and democrecy, then you must teach people the arts of being free and of governing themselves. "[४] ड्यूईंनीं हा मुद्दा मानस-शास्त्रीय दृष्ट्या अधिक स्पष्ट केला आहे. कार्य आणि कारण यासंबंधीची जी त्यांची कल्पना आहे तिच्याहि दृष्टीनें अनुभव संविभागाला ( शेअरिंग ऑफ एक्सुपिरीअन्स ) विशेष महत्त्व येतेंच. कार्याची पद्धति आणि कार्याचें उद्दिष्ट यामध्यें अलगपणा कल्पिणें हीच मुळीं मोठी चूक आहे. एखादें उद्दिष्ट डोळयासमोर ठेवून जेव्हां क्रिया सुरू होते तेव्हां त्या क्रियेंतील प्रत्येक पाऊल म्हणजे साध्याच्या रोखानें केलेली वाटचाल ( पद्-हति ) हा साध्याच्या साक्षात्काराचाच भाग असतो. कांहीं वेळ पावेतो हा भाग मानसिक विचारावस्थेंत असेल तर नंतर तो बाह्य कृतीचा भाग बनेल–पण म्हणून आंतर व बाह्य असा फरक आपल्याला करतां येणार नाहीं. तसा केल्यानेंच जगांतील नीतिविषयक प्रश्न व त्यांतील द्वंद्वें व दुटप्पीपण निर्माण झालें आहे.[५] तेव्हां ' The way we try to achieve something is an inseparable part of whatever we achieve ' हें त्यांच्या साध्यसाधन संबंधाचें सूत्र ठरतें.[६] साध्य हें साधनांतच अनुस्यूत असतें.

व्यक्ति ज्या प्रकारच्या समाजांत वावरते, त्या प्रकारावरून तिचा मानसिक व नैतिक पिंड घडत असतो. केवळ शारीरिक संनिकर्ष वा सामीप्य हें समाजाचें लक्षण नव्हे. समाजांतील प्रत्येक घटकाचे दुसऱ्या घटकावर कांहीं तरी परिणाम घडत असतात व कांहीं व्यक्ति इतरांच्या जीवनाचें नियंत्रण आपल्या हातीं ठेवून त्याला विशिष्ट आकार-वळण देण्याचा

3. The Democratic Form p. 401.
4. Ends and means P. 184-185 ( A. Huxley ).
5. D. & E. 402·3
6. John Dewey–by Jevome Nathanson. P. 94.



अनुक्रमणिका







प्रयत्न करीत असतात. हा जो अनुभव-युक्त सहवास आहे त्यांतूनच व्यक्तीचें चारित्र्य–व्यक्तिमत्त्व घडतें. प्रत्येकजण जरी स्वतःच्या पद्धतीनें कांहीं इच्छा आकांक्षा बाळगीत असला, विचार करीत असला, निर्णय घेत असला तरी त्याच्या या मानसिक कृतीचा आशय, गाभा हा सामाजिक-समाजानें पुरवलेला, सामाजिक संबंधांतून मनांत मुरवलेला असतो.[७] ( What he believes, hopes for and aims at is the outcome of association and intercourse) म्हणून या अनुभवाच्या स्वरूपाला व गुणवत्तेला विशेष महत्त्व आहे. हा अनुभव लोकशाही पद्धतीचा असेल तरच निर्भय व स्वतंत्र विचाराचा नागरिक निर्माण होऊं शकेल. आम्ही आज जीवनाचे अलग अलग कप्पे पाडून प्रत्येकांत वेगवेगळया आचार-नीतीची अपेक्षा करतो. एकीकडे मुलानें निर्भय, स्वतंत्र नागरिक बनावें असें ध्येय, दुसरीकडे मात्र 'आज्ञाधारक'पणा व बिनतक्रार शिस्तपालनाची तालीम; पंचशील व तदन्तर्गत सहकार्यावर ध्येय म्हणून नजर, प्रत्यक्षांत मात्र स्पर्धाप्रधान बक्षिसें–गुणदान, यांवर आधारलेली कार्यपद्धति. जें शिक्षणाच्या जगांत तेंच कामगारांच्याहि. कामगाराचें 'नागरिक'–सुजाण, विचारी, स्वबुद्धीनें चालणारा नागरिक हें ध्येय, पण तो आदर्श कचेरी–कारखान्याबाहेर, त्याच्या आंतमात्र 'Boss bossing' ला वरिष्ठाच्या हडेल-हप्पीला मान्यता. याचा परिणाम म्हणजे लोकशाही व्यक्तित्वाला मुळांतच तडा गेला आहे. त्यासाठीं आमच्या सर्वच सामाजिक संस्थांची व सामाजिक संबंधांची पुनर्रचना व्हायला हवी. व्यक्ति ज्या संस्थेंत काम करते, तेथील वातावरणांतूनच तिच्या मनोवृत्ति व दृष्टिकोण तयार होत असल्यानें व्यापक समाजांत ज्या बहुविध संस्था असतात ( कारण ड्यूईच्या मतें समाजाचें स्वरूप बहुसंस्थात्मक आहे व लोकशाहींत तें तसेंच असायला हवें ) ह्या सर्वांचीच कार्यपद्धति लोकशाही नीतीशीं सुसंगत असली पाहिजे ह्या ड्यूईच्या आग्रहाचें मर्म सहज आकलन होईल.[८]

याच ओघांत व्यक्ति ( इन्डिव्हिज्युअल ) आणि समष्टि ( सोशल ) यांतील परस्परसंबंध ड्यूई कसे विशद करतात हें समजावून घेणें सोयीचें होईल. व्यक्ति व समष्टि वा समाज वा संस्था यांतील परस्पर संघर्ष व संबंध निश्चित करतांना आपण कांहीं ठोकळेबाज कल्पना उराशीं बाळगूनच प्रायः त्या प्रश्नांची उकल करतो. एका बाजूला असते व्यक्ति हाडामासांची, आशा–आकांक्षांची मूर्ति आणि दुसऱ्या बाजूला असते 'संस्था' वा 'समाज'. आणि आपल्यामतें या संस्था वा तो समाज म्हणजे कांहीं ध्येयांची वा तत्त्वांची जणू साकार मूर्तिच ( एम्बॉडीमेंट ) असते. वास्तविक संस्था, समाज, राज्यसंस्था या साऱ्या अमूर्त कल्पना आहेत. प्रत्यक्षांत या कल्पनांच्या मागें कांहीं व्यक्ति, गट, हेच असतात व एका व्यक्तीचा आणि या पक्षांच्या वा गटांच्या हितसंबंधाचा कुठेंतरी विरोध आलेला असतो. पण हा प्रभावीगट आपल्या हितसंबंधाचें संरक्षण व समर्थन "संस्था ही व्यक्तीपेक्षां मोठी आहे" अशा कांहीं उदात्त भासणाऱ्या तत्त्वांच्या जोरावर करीत असतो. तेव्हां व्यक्ति व संस्था यांच्या परस्पर-संबंधाचा विचार करतांना व्यक्ति व समष्टि यांना कांहीं निश्चित व अपरिवर्तनीय अर्थ नाहीं, विशिष्ट प्रसंगाच्या संदर्भांतच विशिष्ट व्यक्ति व विशिष्ट समुदाय यांच्या परस्पर-व्यवहारानुसार त्यांचा अर्थ निश्चित करावयाचा असतो ही गोष्ट आपण ध्यानांत घ्यावयास हवी, असें ड्यूईचें मत आहे. व्यक्ति व समष्टि या अमूर्त संज्ञांत कसलाच संघर्ष उद्भवत नाहीं व पर्याय निवडण्याची गरज पडत नाहीं. याचा अर्थ असा कीं,

7. The Private and the Public P. 367.

8. Democracy in the School 716-721.








संस्था, समाज, सरकार यांचें स्वरूप कार्यात्मक आहे ( फंक्शनल ) आणि म्हणून त्यांत परिस्थितिनुसार फेरबदलाला जागा आहे. वैज्ञानिक पद्धतीचा आश्रय केला तर त्यांच्या संबंधांतील समस्या ह्या शांततेनें व गोडवा कायम ठेवून सोडविणें शक्य आहे. समाजाला व्यक्तिनिरपेक्ष अस्तित्वच नाहीं ( तसेंच तें व्यक्तीलाहि नाहीं ) 'वागर्थाविव' ते संपृक्त आहेत. ड्यूईंचा हा विचार पुढील शब्दांत त्यांनीं निःसंदिग्ध रीतीनें मांडला आहे :

" Society is one word but infinitely many things. It covers all the ways in which by associating together men share their experiences and build up common interests and aims. Society is the process of associating in such ways that experiences, ideas, emotions, values are transmitted and made common ".[९]

" An alphabet is letters and " Society " is individuals in their connections with one another ड्यूईंचा ज्या अनेक द्वंद्वांवर रोख आहे, त्यांतील साध्यसाधनांच्या द्वंद्वाप्रमाणेंच व्यष्टि-समष्टींच्या द्वंद्वांवरहि आहे.

## साधन–वैज्ञानिक पद्धति

ड्यूईंच्या सर्वच विचारसरणींत 'साधना'ला व 'पद्धती'ला प्राधान्य असल्यानें सामाजिक संघर्ष वा लोकशाही जीवन यासाठीं उपयुक्त ठरणाऱ्या पद्धतींची चर्चा हा त्यांच्या सामाजिक तत्त्वज्ञानाचा महत्त्वाचा भाग आहे. विज्ञानानें व तंत्रविद्येनें निर्माण केलेल्या समस्या आपण जुन्या तत्त्वावरील ठाम श्रद्धेनें व आग्रहीपणानें सोडवूं पाहतों, ही एक विस्मयजनक व खेदजनक बाब आहे असें त्यांचें मत आहे. विज्ञानांत पडलेली प्रचंड भर, शास्त्रीय ज्ञानांत झालेली वाढ सर्वांना स्वागतार्ह वाटते.[१०] पण जेव्हां त्या शास्त्रीय ज्ञानाच्या उपयोगांतून जवाएवढें सुख व पर्वताएवढें दुःख निर्माण होतें तेव्हां सारींजण सचिंत बनतात, क्वचित् हतबुद्ध होतात. या बाबतींत ड्यूईंचें म्हणणें असें कीं भौतिक शक्तींचें नियंत्रण करण्यासाठीं आम्ही वैज्ञानिक पद्धतीचा उपयोग करतों, पण मानवी शक्तीच्या नियंत्रणविनयनासाठीं मात्र तो करीत नाहीं. आमच्या सर्व समस्या जर वैज्ञानिक पद्धतीचा उपयोग करून सोडवण्यासाठीं आम्ही पुढें येऊं तरच प्रत्येकानें सामाजिक अनुभवांत 'जबाबदारी'नें व 'जाणतेपणें' ( responsibly and intelligently ) भाग घेतल्यासारखें होणार आहे. या तऱ्हेच्या मनोवृत्ति व आचार-बंध वा वागणुकीच्या सवयी निर्माण करणें हें शिक्षणसंस्थांचें कार्य आहे.

ड्यूईंनीं विवरलेल्या वैज्ञानिक दृष्टिकोणाचें सर्व विवेचन येथें करणें अशक्य ठरेल. पण तिचीं तीन-चार ठळक लक्षणें सांगायला हरकत नाहीं. वैज्ञानिक वृत्ति ही प्रयोगशील असते, तसेंच ती निवेदनशील व प्रसरणशील असते. प्रत्येक प्रश्न उजेडांत आणावा, खुल्या मनानें हाताळावा आणि जीं नवीं सत्यें प्रगटतील त्याशीं इमान राखावें, ही अपेक्षा वैज्ञानिक वृत्तींत आहे. या तऱ्हेची वृत्ति ठेवून व सर्वांना स्वातंत्र्य देऊन जेव्हां सर्व लहानमोठ्या सामाजिक गटांचें संचालन होऊं लागेल तेव्हां आपण वैचारिक लोकशाहीकडे वाटचाल करूं लागलों असें म्हणतां येईल.

या वैज्ञानिक दृष्टींत, 'बुद्धि' ( इन्टलिजन्स ) विचारशक्ति वा चिकित्सकपणा, परिणामाचा अंदाज घेणारी कल्पनाशक्ति वा दूरदर्शित्व यांनाच महत्त्व असल्यानें मानवाच्या या शक्तीचा विकास हाच

9. Reconstruction in Philosophy p. 200.

10. State and Society p. 381.



अनुक्रमणिका






त्याचा खराखुरा विकास होय. या बुद्धीच्या विकासाच्या बाजूनें अखेरचा म्हणून त्यांनीं जें विवेचन केलें आहे, त्यांत पुनः साध्य-साधनांच्या संबंधावरच भर दिला आहे. 'लोकशाही– हें अंतिम ध्येय मान्य करावयाचें, पण लोकशाहीची मुस्कटदाबी हें साधन मानावयाचें ही गोष्ट ज्यांना लोकशाहीचीं सामान्य तत्त्वें सुद्धां समजलीं नाहींत, अशाच राष्ट्रांत ही गोष्ट शक्य आहे.[११] ही बुद्धि निसर्गानें सर्वांना समान दिली नाही, या गोष्टीची दखल घेऊन ते म्हणतात कीं निसर्गाची ही उणीव भरून काढण्याकरितांच कायद्यानें व राज्यव्यवस्थेनें संधीची समानता उपलब्ध करून द्यायला हवी. या बुद्धीचा विकास सह-कृत प्रयत्नांत व अनुभवांतच होऊं शकतो व अशी 'सामाजिक' बनलेली बुद्धि ही समाजाची मोठी साधनसंपदा आहे (Intelligence is a social asset) असें ते मानतात.

ड्युईंच्या तत्त्वज्ञानाला वा विचारपद्धतीला प्रॅग्मॅटिजम् असें नांव दिलें गेलें आहे. त्यांनींहि तें स्वीकारलेलें आहे. 'उपयुक्ततावाद' या नांवानें मराठींत त्याचा उल्लेख प्राय: केला जातो, आणि या शब्दानें प्रॅग्मॅटिजम् म्हणजे कांहीं तरी उथळ विचारसरणी आहे, जीवनांच्या भोगपरायणतेवर ती आधारलेली आहे, असा गैरसमजहि निर्माण होतो. स्वतः ड्यूईंनीं त्या संज्ञेचें स्पष्टीकरण पुढीलप्रमाणें केलें आहे :

"ही जी ज्ञानप्रक्रियेची विचारसरणी (थिअरी) या ग्रंथांत विवरली आहे, तिला प्रॅग्मॅटिजम् असें नांव देतां येईल. तिचें वैशिष्ट्य हें आहे कीं, परिसरांत सहेतुकपणें परिवर्तन घडवून आणण्याची जी क्रिया चालू असते, तिचें व ज्ञानाचें अखंड साहचर्य या विचारसरणींत कायम ठेवलें जातें. या विचारसरणीप्रमाणें, 'कांहींतरी उपार्जित' या निश्चित अर्थानें ज्ञान म्हणजे आपली सर्व बौद्धिक वा मानसिक साधन संपदा—आपल्या कृतींना डोळसपणा, सुबुद्धपणा आणणाऱ्या आपल्या मनोवृत्ति. जें जें आपल्या मनोवृत्तींत सुसंघटितपणें एकजीव झालें आहे व तसें झाल्यानें ज्यामुळें आपल्या परिसराचा आपण आपल्या गरजानुकूल उपयोग करून घेऊं शकतों, आणि ज्या प्रसंगांतून जातो, त्याचीं आपलीं उद्दिष्टें व आकांक्षा ज्याच्यामुळें आपण जुळवून घेऊं शकतों, तेंच खरें ज्ञान"[१२] सारांश, या विचारसरणींत क्रियात्मक, कार्यप्रवण व कार्यक्षम अशा ज्ञानावर भर आहे. आणि जीवनाचें स्वरूप प्रवाही असल्यानें ज्ञान संपादनाचें कार्य नित्य सुरूच राहतें, व राहिलें पाहिजे, असें मानलें जातें. प्रतिक्षणीं नव्या उद्भवणाऱ्या प्रसंगांना कसें तोंड द्यायचें, त्यावेळी कसें वागायचें या साठीं आधीं ठरविलेले ठोकळेबाज 'सिद्धान्त' उपयोगी पडणार नसून, त्या त्या वेळीं बुद्धीनें घेतलेले निर्णय त्या प्रसंगांत योजून व पारखून त्या प्रसंगांतून बाहेर पडावयाचें असतें. याचा अर्थ मानवाची विचारशक्ति सदैव जागरूक हवी, डोळस हवी. तशी ती राहील तरच त्याची मानव म्हणून प्रतिष्ठा आहे.

दार्शनिक दृष्ट्या या विचारसरणीवर कांहींहि आक्षेप असले तरी एक गोष्ट निश्चित आहे. तीं म्हणजे प्रॅग्मॅटिजम् वा फलसिद्धिवाद ही उथळ विचारसरणी तर नव्हेच पण उलट मानवाला सतत क्रियाप्रवण बनविणारी ती एक गतिमान् विचारसरणी आहे. अंतिम सत्याचा शोध आपल्याला लागला आहे, ज्ञानसिंधु एका बिंदूंत गवसला आहे, असें म्हणून मानवानें स्वस्थ न बसतां ज्ञानाचा अखंड शोध घेत पुढेंच जायचें आहे. या प्रयत्नांत एक क्षितिज गांठलें असें वाटावें, तो क्षितिजाच्या कडा अधिकच विस्तारत जातात, नवी क्षितिजें दिसूं लागतात. मानवाच्या बुद्धीला व कर्तृत्वाला त्यांत आव्हान आहे.

11. The Class struggle P. 449.

12. D. & E. p. 400.








या बुद्धीच्या विकासांतच मानवाचें मानव्य सामावलें आहे, त्याचें साफल्य आहे. आणि सहजीवनावर आधारलेल्या सह-कृतींतील अनुभवाच्या आदान-प्रदानावर तो विकास अवलंबून आहे. या अशा देवाण-घेवाणींतच आपलें वैशिष्ट्य प्रत्येकाला कळून येणार असून, त्यांबरोबरच ज्या समाजांत आपण वावरतो, त्या समाजाच्या ध्येय-आकांक्षाचेंहि ज्ञान आपल्याला होत असतें. तें समजून घेऊन व्यक्तीनें सेंद्रीय शक्तींचें मानवी साधनांत व मूल्यांत परिवर्तन घडवून आणण्यासाठीं आपला वाटा उचलावयाचा असतो.

" To learn to be **human** is to develop through the give and take of communication, an effective sense of being an individually distinctive member of a community, one who understands and appreciates its beliefs, desires and methods and who contributes to a further conversion of organic powers into human resources and values "[१३]

या दृष्टीनें पाहिल्यास ड्यूईचा जीवनादर्श कसा भव्य आहे याची कल्पना येते. अतीन्द्रिय विश्व व त्यांतील एखादी सद्‌वस्तु न गृहीत धरतां दृश्य विश्वाच्या व इन्द्रियग्राह्य अनुभवाच्या आधारावरच जीवनदर्शनाची इमारत रचावयाची व तीहि ' सत्यं शिवं, सुंदरं ' यासारख्या मूल्यांच्या आधारें, असा प्रयत्न अनेक तत्त्वज्ञानांनीं केला आहे ( आपल्याकडे श्री. वा. म. जोशी यांनीं या तऱ्हेच्या प्रश्नांचा सखोल ऊहापोह एकेकाळीं आपल्या साहित्यांत केला) ड्यूई त्यापैकीच एक होत. मानवी जीवनांत अर्थ व काम या प्रेरणांच्या पलिकडे कांहीं प्रेरणा आहेत, नव्हे त्या आहेत म्हणूनच सारी 'संस्कृति' निर्माण झाली आहे. विज्ञानांत असें एक सामर्थ्य आहे व असा एक शक्तिप्रवाह कीं, त्यांतून एक असा दिवस उगवेल कीं ज्यावेळीं सर्व व्यक्ति इतरांच्या शोधांत सहभागी होतील. आणि त्यांच्या अनुभवाला प्रकट व्हायला वाव मिळून त्याची समृद्धि होईल, अशी ड्यूईची श्रद्धा आहे. समाजांतील अर्थव्यवस्थेचें अखेर प्रयोजन काय ? तर व्यक्तीच्या शक्तीला सुसंबद्ध रीतीनें प्रगट होतां येईल असा भक्कम पाया घालून देणें आणि आर्थिक व्यवहाराव्यतिरिक्त मानवाच्या ज्या अनेक गरजा आहेत, त्यांची पूर्तता होईल असें वातावरण तयार करून देणें—ह्या वातावरणाची कसोटी ही कीं, मानवाचें अवधान व शक्ति यांना विशेष ताप न देतां जीवनांतील बौद्धिक, सामाजिक व सौंदर्यात्मक मूल्यें आविष्कृत होण्यास योग्य बैठक त्यांत असेल.[१४] त्यांच्या डोळयासमोर जें स्वप्न तरळत होतें व मानवाला लाभलेल्या विज्ञानाचा योग्य पद्धतीनें त्यानें उपयोग केला तर जें स्वप्न वास्तव आहे असें त्यांना वाटत होतें तें रेखाटतांना ते म्हणतात :

" A vision of a day in which the natural sciences and the technologies flow from them are used as servants of a human life constitute the imagination that is relevant to our own time. A humanism that flees from science as an enemy denies the means by which a liberal humanism might become a reality "[१५]

कालप्रवाहांत मानवाला जें उपलब्ध झालें आहे, तें फेकून देण्यांत शहाणपण कोणतें ? सर्वोदयी ग्रामराज्यांतहि अणुशक्तीच्या वापराला वाव आहे, असें जेव्हां विनोबाजी म्हणतात तेव्हां हीच शास्त्रविज्ञान ( सायन्स व टेक्नॉलॉजी ) आणि करुणा ( ह्युमॅनिजम् ) चा सुंदर मेळ घालण्याची दृष्टिच ते व्यक्त करीत नाहींत काय ?

13. Communal living p. 389.
14. Meaning and office of Liberalism p. 453.
15. Socialising Intelligence p. 460.








## जॉन ड्यूई–व्यक्ति आणि कांहीं विचार

ड्यूईचें तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र व समीक्षापद्धति इत्यादि क्षेत्रांतील सर्वच विचारसरणी व तिचा तपशील शंभर टक्के सर्वांना पटला नसला व पटणें शक्य नसलें तरी त्यामुळें त्यांचें जागतिक तत्त्वज्ञान्यांतील स्थान गौण ठरत नाहीं. खुद्द अमेरिकेंत हॉर्ने व हचिन्सन यासारखे टीकाकार त्यांना लाभले आहेत. पण आजच्या कालांत उपस्थित झालेले प्रश्न कोणते, व त्याची सोडवणूक करण्याची दिशा त्यांनीं आपल्या परीनें समाजाला दाखविली. विशेषतः शिक्षणक्षेत्रांत त्यांच्या विचारसरणीचा ठसा खूप उमटला आहे. लोकशाही जीवनपद्धतीला सजविण्यासाठीं त्यांनीं पुरस्कारलेल्या पद्धतींचे प्रयोग आज अमेरिकेंत अनेक संस्थांत ( केवळ शैक्षणिकच नव्हे ) विविधप्रकारें होत आहेत. विज्ञानयुगाची व लोकशाही जीवनपद्धतीची सुसंगत सांगड घालण्यासाठीं स्वतःची वाणी–लेखणी व काया आजन्म झिजवणारे ड्यूई लोकशाहीचे उद्गाते म्हणून अनेक भावी पिढ्यांच्या कृतज्ञतेस निश्चित पात्र होतील.

---










श्री. पन्नालाल सुराणा

# मुंबई सरकारचें सीलिंगविषयक विधेयक

शेतजमिनींतील मालकीहक्कांत निर्माण झालेली विषमता कमी करण्यासाठीं एका व्यक्तीनें किती जमीन धारण करावी याबाबतची कमाल-मर्यादा बसविणें आवश्यक आहे हें सर्वमान्य झालें आहे. भारतांत समाजवादी धर्तीची समाजरचना प्रस्थापित करण्याचें अंतिम उद्दिष्ट सर्वसाधारणपणें मान्य झालें आहे. तेव्हां या देशांत सीलिंगचे कायदे शक्यतों लवकर पास होऊन त्यांची अंमलबजावणी होणें जरूरीचें आहे. सीलिंग बसविण्याचें दुसरें एक कारण सांगितलें जातें कीं जर प्रत्येक कसणाराला स्वतःची जमीन मिळाली तर त्यामुळें त्याला उत्पादन वाढविण्याची प्रेरणा मिळेल. हें तत्त्वतः कितपत खरें आहे तें तपासण्याची येथें गरज नाहीं. भारतांतल्या विशिष्ट सामाजिक परिस्थितींत इथल्या कसणाराला जमिनीवर हक्क मिळवून दिला तर त्यामुळें तो उत्पादन वाढविण्याची ईर्षा बाळगीलच असें छातीठोकपणें सांगता येत नाहीं. पण अलिकडल्या अनुभवावरून अशी प्रवृत्ति हळुहळूं वाढते आहे हें मात्र नाकारतां येणार नाहीं.

भारताच्या आजच्या परिस्थितींत सीलिंगचा कायदा करण्याचीं आणखी दोन कारणें आहेत. आपल्या शेतीची संघटना अनेक कारणांमुळें अतिशय गुंतागुंतीची झाली होती. मधले दलाल नष्ट केल्यानें त्यांत थोडा व्यवस्थितपणा आला. कुळांना संरक्षण दिल्यानें एक प्रकारचें संघटनेचें स्थैर्य निर्माण होतें. निरनिराळया राज्यांत, व विशेषतः मुंबईत, झालेल्या कूळकायद्यांनीं हा हेतु फारच थोड्या अंशानें साध्य झाला आहे हें निराळें. पण कायद्याची अंमलबजावणी व्यवस्थित झाली तर हें होऊं शकेल. यानंतर मालकीहक्कांतील विषमता कमी होऊन शेतकरी-वर्गांत एकपेशीपणा ( uniformity ) आणणें आवश्यक आहे. म्हणजे मग भारतीय शेतकरी–किंवा त्या त्या राज्यांतील शेतकरी–म्हटला कीं त्याचें प्रातिनिधिक स्वरूप डोळयासमोर स्पष्टपणें येऊं शकेल. आर्थिक नियोजनाच्या संदर्भांत याची विशेष गरज आहे. शेतीं विकासाचा कार्यक्रम आखतांना जो सर्वसाधारण शेतकरी गृहीत धरावा लागतो तो अशा प्रकारें प्रतिनिधिक स्वरूपांत डोळयांसमोर आला कीं फारच सोय होईल. त्या कार्यक्रमाला वास्तवतेचें अधिष्ठान मिळत जाईल.

दुसरें कारणहि याच स्वरूपाचें आहे. आपल्याकडील मोठे जमीनमालक हे स्वतः शेती न करतां दुसऱ्यांमार्फत ती करवून घेतात. बहुधा ते लोक आपल्या शेतीच्या गांवापासून फार दूर राहात असतात. त्यामुळें दैनंदिन देखरेख तर नाहीच, पण शेतीसुधारणेच्या दृष्टीनें कांहीं कामें व्हायला पाहिजेत तींहि मुळींच होत नाहीत. ही अनुपस्थित मालकी ( absentee landlordism ) पुसून टाकणें आवश्यक आहे. ज्याला शेतींतून उत्पन्न मिळवायचें आहे त्यानें तें उत्पन्न वाढविण्याचाहि सतत प्रयत्न केला पाहिजे. त्यासाठीं त्यानें शेतीच्या जवळ राहिलें पाहिजे व शेतीसुधारणेंत पुढाकार ( initiative & enterprise ) घेतला पाहिजे. अन्यथा त्यानें शेती सोडून द्यावी, व ती कसणाराला देण्यांत यावी. ही सुधारणा करण्यासाठीं सीलिंग बसविणें अगदी अपरिहार्य नसलें तरी त्यामुळें तें सोपें जातें हें उघड आहे. अशाप्रकारें अनुपस्थित मालकी नाहिशी केली कीं शेतकरीवर्गाचें प्रतिनिधिरूप चित्र जास्त सोपें व स्पष्ट होण्याला मदत होते, व सरकार त्यांच्याबाबतींत वास्तववादी भूमिकेवरून विचार करू शकतें, कार्यक्रम आखूं शकतें.

## सीलिंग-कायदा आजच केला तर – चूक ठरेल काय ?

या सर्व कारणांसाठीं सीलिंगचा कायदा होणें आवश्यक आहे हें तत्त्वतः मान्य असलें तरी कांहीं मातबर मंडळींनीं असा प्रश्न उपस्थित केला आहे कीं, सीलिंगचा कायदा आजच करण्यानें तो अन्यायकारक होईल. प्रा. ध. रा. गाडगीळ यांनीं गेल्या ऑगस्टच्या








दुसऱ्या आठवड्यांत जें निवेदन प्रसिद्ध केलें त्यांतील भूमिका हीच आहे. त्यांचें थोडक्यांत म्हणणें असें कीं बिगर शेती क्षेत्रांत व्यक्तीला वाटेल तितकें उत्पन्न मिळविण्याचें रान मोकळें ठेवून फक्त शेतींतच उत्पन्न वाढविण्यावर मर्यादा घालूं नये. नाहीतर त्यामुळें सधन शेतकरी आज स्वतःची जी थोडीफार राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक प्रगति साधूं शकतात ती अशक्य होईल. तसेंच सहकारी शेतीची यंत्रणा सुरळितपणें चालूं लागली व त्यांतून शेती-उत्पादन वाढतें आहे असें दिसूं लागलें म्हणजे मग सीलिंगच्या प्रश्नाला हात घालणें शहाणपणाचें ठरेल.

पण ही भूमिका कांहींशी एकांगी व विकृत वाटते. शेती–बिगरशेती भेदाचा मुद्दा खरा आहे पण तो सकृद्दर्शनी. कारण एक तर सीलिंगमुळें जमीनधारणेवर मर्यादा येणार आहे, उत्पन्नावर नाहीं. आजच्या शेतीच्या अवस्थेंत सुधारणेला खूप वाव आहे. त्यामुळें शेतीचें उत्पन्न दोन किंवा तीन पटींनीं देखील वाढविणें शक्य आहे असा कांहीं तज्ञांचा अंदाज आहे. अर्थात् या प्रकारच्या सुधारणेला देखील कुठे तरी अंतिम मर्यादा पडणारच. पण ती फार संकुचित असणार नाहीं. आणि इतर कारणांसाठीं ती ठेवणें आवश्यक आहे. दुसरा भाग असा कीं बिगरशेती क्षेत्रांत तरी वाटेल तितकें उत्पन्न वाढवायला मोकाट स्वातंत्र्य आहे काय ? निरनिराळीं नियंत्रणें व कर यामुळें त्या स्वातंत्र्याला बराच पायबंद बसला आहे. शिवाय या क्षेत्रांत देखील स्वतंत्र व्यापार वा उद्योग करून मोठ्या प्रमाणावर धनसंचय करूं शकणारांची संख्या किती आहे ? संबंध भारतांत आधीं इन्कमटॅक्स भरणारांची संख्याच जेमतेम ८–१० लाख आहे. यांत कंपन्या व नोकरदार वर्ग निम्म्यापेक्षां जास्त असेल. बाकीच्या ३–४ लाख लोकांनाच व्यक्तिशः हें अनियंत्रित स्वातंत्र्य उपभोगतां येतें. तेंहि नियंत्रणें व कर–पद्धतींच्या चौकटींत. तेव्हां बिगर शेती क्षेत्र म्हणजे अगदी मोकळें कुरण आहे, आणि सीलिंगमुळें शेतींत मात्र कांटेकोर रेशनिंग आहे असा ग्रह करून घेणें योग्य नाही.

बिगरशेती क्षेत्रांत देखील सरकारी उद्योगधंद्यांचें प्रमाण वाढतें आहे. आजच देशाच्या व्यवसायांत १०–१२ टक्के असलेल्या उद्योगांत ( manufacturing ) मोठी कारखानदारी ३–४ टक्के व बाकीचे ग्रामीण वा छोटे उद्योग आहेत. यापुढें या दुसऱ्या वर्गाचें प्रमाण व शक्ति वाढविण्याचें धोरण असायला पाहिजे असा पुरोगामी शक्तींचा आग्रह आहे.

हें सर्व वजा जाऊनसुद्धां बिगर शेतींत उत्पन्नवाढीचें स्वातंत्र्य तुलनेनें जास्त आहे व येत्या कांही पिढ्यांत तें कसें राहील हें मान्य करावें लागतें. पण त्याला तशींच कारणेंहि आहेत. आज शेतींत संपृक्तता ( saturation ) आलेली आहे. लागवडीखाली ३२ कोटी एकर आहे तर लागवडीखाली येण्यासारखी अवघी ६–७ कोटी एकर आहे. म्हणजे जमीन वाढण्याची शक्यता नाहीं. ( उलट आजूबाजूचे भाईबंद त्यांतलीच कांही बळकावण्याची शक्यता आहे ! ) आणि लोकसंख्या–वाढीमुळें व भांडवल–तुटवडा, आर्थिक विकासाचा–विशेषतः औद्योगिकरणाचा–वेग यामुळें आज जी लोकसंख्या शेतींत अवलंबून आहे, तिला तेथें ठेवावें लागेल. मग कांही थोड्यांना उत्पन्न वाढीचें स्वातंत्र्य उपभोगूं देण्यासाठी बहुजनांना अन्यायांतच पिचत ठेवणें योग्य होईल काय ? तेव्हां शेतीच्या विशिष्ट परस्थितीमुळें–अंतर्गत घडणीमुळें सीलिंगची सुधारणा शक्यतों लवकर घडवून आणली पाहिजे. " हें संरक्षित जंगल आहे, मोकाट शिकारीसाठी दुसरीकडे हवें तर जा " असें देखील नाईलाजानें म्हणावें लागेल.

आणि दुसरीकडे तशी शक्यताहि आहे. उद्योगधंद्यांच्या वाढीसाठीं नैसर्गिक साधनसामग्री व भांडवल यांची विशेष गरज आहे. आपल्या देशांत जी अशा प्रकारची साधनसामग्री आहे ती सर्वच्या सर्व उपयोगांत आणली जात नाही. किंबहुना त्यांतला मोठा हिस्सा अजून तरी अस्पृष्टच आहे. देशाच्या उत्पादनवाढीसाठीं या क्षेत्रांत मुलुखगिरीचें स्वातंत्र्य आणखी २५–३० वर्षें तरी ठेवावेंच लागेल. सीलिंगमुळें कुचंबणा झालेल्या शेतकरी-बहाद्दरांनीं आपली नजर तिकडे वळवावी.

तें त्यांना शक्यहि आहे. जे मोठे शेतकरी आहेत ते केवळ शेतींतच सर्व लक्ष घालतात असें नाहीं. हळुहळू सावकारी, व्यापार व उद्योगधंद्याकडे त्यांचें लक्ष जातच असतें. रूरल क्रेडिट सर्व्हेच्या अंदाजाप्रमाणें ग्रामीण कर्जपुरवठ्यापैकी सुमारें ४४ टक्के भाग हा








मोठया शेतकऱ्यांच्यामार्फत पुरविला जातो. व्यापार व उद्योगधंद्यांत किंबहुना डॉक्टरी-वकिली यासारख्या व्यवसायांत मोठया शेतकऱ्यांनीं शेतीचा धंदा चालूंच ठेऊन किती प्रमाणांत प्रवेश केला आहे याबद्दलची आंकडेवारी उपलब्ध नाही. पण डोळस निरीक्षकाला याबाबतींत स्वतःचे अंदाज बांधतां येतात. अशा निरीक्षणानंतर देखील सीलिंगमुळें मोठया शेतकऱ्यांची का होईना पण अगदी मुस्कटदाबी होणार आहे असें कितपत प्रामाणिकपणें म्हणतां येईल ?

उत्पन्न वाढण्याला सीलिंगमुळें फारशी आडकाठी येत नसल्यानें मोठया शेतकऱ्यांना आज जो राजकारणांत भाग घेतां येतो, वा आपल्या मुलांना उच्च शिक्षण देतां येतें. त्यांतहि फारशी बाधा येण्याचें कारण नाही. पण राजकारणांत भाग घेण्यासाठीं आज स्वतः-च्या पैशावर अवलंबावें लागणाऱ्यांची संख्या कमी होत चालली आहे. राजकारण हें संघटनात्मकरीत्या, सार्वजनिक निधीच्या साहाय्यानें करण्याकडेच प्रवृत्ति वाढते आहे, व तें योग्य आहे. त्यामुळें मोठयाच काय पण अगदी लहान शेतकऱ्यांना देखील असा भाग घेणें सोपें जाईल.

शिक्षण, आरोग्य इ. सामाजिक सुखसोयींच्या बाबतींत तर समाजवादी-किंबहुना कल्याणकारी राज्याला देखील खूपच व्यापक भूमिका घेतली पाहिजे. प्रत्यक्ष आर्थिक विषमता नष्ट करण्याच्या कार्यक्रमावर सध्यां जितका भर दिला जातो त्यापेक्षां जास्त समाज कल्याण-कार्यावर दिला जातो आहे व हें प्रमाण वाढत गेलें पाहिजे. मुंबई सरकारनें एवढयांतच नऊशें रुपयापेक्षां कमी वार्षिक उत्पन्न असलेल्या कुटुंबांच्या मुलांना मोफत शिक्षणाची सोय केलीच आहे. ही मर्यादा हळुहळू चार हजारापर्यंत वाढवली पाहिजे व त्याचबरोबर वसतिगृह इ. यासारख्या सोयी देखील उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. याला अर्थातच वेळ लागेल. पण म्हणून तेवढयासाठी सीलिंगला विरोध करता यावयाचा नाही. नाहीं तर मग हींच कारणें कशाला – वृद्धापकाळाची सोय, अपघाताविरुद्ध उपाययोजना अशाहि कारणासाठीं सीलिंगला विरोध करतां येईल.

## सहकारी यंत्रणा व सीलिंगचा प्रश्न – यांचा मेळ कसा घालतां येईल ?

राहतां राहिला आधी सहकारी यंत्रणा उभी करण्याचा मुद्दा. या मुद्यावरून सीलिंगला कसा काय विरोध करता येतो तें समजतच नाही. खुद्द प्रा. ध. रा. गाडगीळांनीं सहकारी शेतीचा पुरस्कार करतांना एकदोन ठिकाणीं सार्वजनिकरीत्या असें म्हटलें आहे की, सुरुवातीला अगदी लहान शेतकरी व भूमिहीन शेतमजूर यांच्या सोसायटया बनवाव्यात; आणि या सोसायटयांना सीलिंगमुळें उपलब्ध होणारी जमीन द्यावी. आणि तर्कतः हेंच बरोबर आहे. पण मग सहकारी संस्था तयार होईपर्यंत सीलिंग का थांबवायचें ? आणि सीलिंग बसवलें नाही तर भूमिहीनांच्या सोसायट्या बनवून करायचें काय ? खरें म्हणजे हीं दोन्हीं कामें साधारणपणें एकाचवेळीं सुरू करावीं लागतील. त्यांत सीलिंगचा कायदा व अंमलबजावणीचें काम हें ३–४ वर्षांत संपवतां येईल; मात्र सहकारी शेती सोसायट्या कार्यक्षम व किफायतशीर बनवायला स्वाभाविकपणेंच जास्त अवधि लागेल.

या दृष्टीनें पाहतां मुंबई सरकारनें ता. ४ ऑगष्ट १९५९ रोजीं सीलिंगविषयक विधेयक प्रसिद्ध केलें आहे त्याचें स्वागतच करावें लागेल. गेल्या जानेवारींत नागपूर येथें सीलिंगचा कायदा सर्व राज्यांत एक वर्षाच्या आंत करण्याची घोषणा काँग्रेसनें केलेली आहे. पण नंतर सहकारी शेतीवरील वादावादीपेक्षां जास्त कांही तिनें केलें नाही. फक्त उत्तर प्रदेश व मुंबई या दोन राज्यांनींच निदान विधेयकें तरी प्रसिद्ध केलीं. एका वर्षाच्या आंत यांनीं निदान एवढें तरी केलें याबद्दलदेखील या दोन सरकारांच्या नेत्यांचें अभिनंदन केलें पाहिजे ! बाकीच्या सरकारांची शाब्दिक कसरत मनोरंजक तरी खास आहे.

पण मुंबई सरकारचें विधेयक आज ज्या स्वरूपांत आहे त्याच स्वरूपांत तें मंजूर झालें तर त्यामुळें अपेक्षित हेतु कितपत साध्य होईल याबद्दल जबरदस्त शंका वाटते. या विधेयकाची साधारण रूपरेषा अशी : वर्षाला रु. ३६०० निव्वळ उत्पन्न देणाऱ्या जमिनीचें क्षेत्र ही कमाल मर्यादा सुचविण्यांत आली आहे. त्या त्या भागांत होणारीं सर्वसाधारण पिकें व त्यांचा गेल्या पांच वर्षांतला सरासरी बाजारभाव यावरून शेतीचे दर एकरीं उत्पन्न ठरविण्यांत येणार असून, त्यापैकीं निम्मा उत्पादन खर्च धरला जाईल. थोडक्यांत आज घडीला रु. ७२०० एकूण ( gross ) उत्पन्न देणारें क्षेत्र ही कमाल मर्यादा ठरणार आहे.








या मर्यादेवरील जमीन सरकार आपल्या ताब्यांत घेईल व त्याबद्दल मोबदला देईल. शेतसाऱ्याच्या १०० पट इतका मोबदला असेल व तो रोखीनें अगर कर्ज रोख्याच्या रूपानें दिला जाईल. अशाप्रकारचा कायदा होणार असल्याचा बराच गवगवा झाल्यानें शेतमालकांनीं वांटणी-विक्री-बक्षिसपत्र इत्यादि मार्गांनीं आपली जमीन सुरक्षित करण्याचा प्रयत्न केलाच आहे. त्यावर उपाययोजना म्हणून १५ जानेवारी १९५९ नंतरचें अशा प्रकारचे शेतजमिनीसंबंधीचे सर्व व्यवहार रद्द ठरविण्यांत आले आहेत. फेरवाटपांच्या वेळीं तुकडेतोड होऊं नये याचीहि दक्षता घेतली आहे. पण याच्या अंमलबजावणीचा बोजा नेहमीप्रमाणेंच महसुली यंत्रणेवर टाकण्यांत आला आहे.

सीलिंगचा आधार निव्वळ उत्पन्न धरण्यांत आलें आहे हें एका दृष्टीनें जास्त शास्त्रशुद्ध वाटतें. शेतींतलें दर एकरीं उत्पादन अनेक गोष्टींवर अवलंबून असतें. त्यामुळें एका भागांत एकरीं जेमतेम १०० रुपये उत्पन्न मिळतें तर दुसऱ्या भागांत तें १००० पर्यंत देखील जातें. तेव्हां निरनिराळ्या प्रदेशांना सरसकट विशिष्ट एकरांच्या क्षेत्रफळाची मर्यादा लावण्यापेक्षां उत्पन्नाचा आधार ठरवून त्यावरून त्या त्या भागांतलें सीलिंगचें क्षेत्रफळ निश्चित करणें जास्त संयुक्तिक होईल हें खरें.

पण यांत अनेक अडचणी आहेत. मुख्य म्हणजे अशा प्रकारें विभागवार शेतीउत्पन्नाचा अभ्यास करून अगदी कांटेकोरपणें सगळीकडे रु. ७२०० उत्पन्नाचें क्षेत्रफळ ठरविणें हें अत्यंत कठीण काम होऊन बसेल. एका सलग प्रदेशांत देखील पीकवारी ( crop-pattern ) इतकी भिन्नभिन्न असते की अमुक एक शेत हें प्रातिनिधिक आहे असें म्हणतां येणार नाहीं. अंमलबजावणीचें काम आधीच किती किचकट असतें याची कल्पना जाणत्यांना आहेच. तेव्हां अंमलबजावणीचें काम जितकें जास्तींत जास्त सोपें करतां येईल तितकें चांगलें. कायदाहि शक्यतो सोपा सुबोध असलेला बरा.

दुसरी गोष्ट अशी की जमिनीचा कस, हवामानांतील फरक, इतर सुखसोयी, सर्वसाधारण प्रगतीची पातळी, पिकवारी या सर्वांमुळें जरी दर एकरीं उत्पन्नांत फरक पडत असला तरी फार मोठ्या फरकाचें मुख्य कारण म्हणजे पाणीपुरवठाच होय. सोलापूर जिल्ह्यांतील ज्वारीखालील शेतींत ( जिराईत ) दर एकरी १०० ते १२५ चें उत्पन्न येत असेल तर त्याहून थोड्या हलक्या असलेल्या बीड-परभणी जिल्ह्यांत तें ८० तें १०० पर्यंत येतें. पण मुख्य फरक पडतो तो पाण्यामुळेंच. एकतर जिराईतींत अजिबात न होणारीं ऊस, कापूस, गहू, या मालासारखीं पिकें फक्त बागायतींत होतात, व त्यांचीच किंमत जास्त असते. दुसरें, पाणी पुरवठ्यामुळें वर्षांतून किमान दोन पिकें तरी घेतां येतात. आणि त्यामुळेंच जिराईतींतले दर एकरीं उत्पन्न १००–१५० रु. चें असलें तर बागायतीचें दर एकरीं उत्पन्न साधारणपणें १०००–१२०० असतें व तें थेट २०००–२५०० पर्यंत देखील जाऊं शकतें.

तेव्हां पाणीपुरवठ्यानुसार जमिनीचें वर्गीकरण करून प्रत्येक वर्गासाठीं विशिष्ट एकरसंख्या हा सीलिंगचा आधार ठरविल्यास तें जास्त सोपें होईल व फारसा अन्यायहि होणार नाही.

## भूमिहीनांचा प्रश्न व सीलिंग मर्यादा

हा झाला मुख्यतः कारभारविषयक मुद्दा. आतां सीलिंगच्या प्रश्नाच्या गाभ्याचा विचार केला पाहिजे. सीलिंगचा कायदा करून कांहीं अतिरिक्त जमीन सरकारजमा करून घ्यावी व ती भूमिहीन शेतमजूरांना वाटावी हा या विधेयकाचा महत्त्वाचा उद्देश मानला आहे. तर तो साध्य होण्याच्या दृष्टीनें रु. ७२०० एकूण उत्पन्नाची कमालमर्यादा योग्य आहे काय तें पाहिलें पाहिजे. या आंकड्याच्या अनुरोधानें सीलिंगमुळें जेमतेम ३ ते ४ टक्के जमीन सरकारजमा होईल असा अंदाज अधिकारी गोटांतून व्यक्तविण्यांत येत आहे. कारण जिराईत भागांत या उत्पन्नासाठी ६० ते १८० एकरापर्यंतचें क्षेत्र लागेल.

मुंबई राज्यांतील लागवडीखालील एकूण जमीन ६ कोटी ९५ लाख एकर आहे. यापैकीं ३–४ टक्के म्हणजे फक्त २० ते २५ लाख एकर जमीन सीलिंगमुळें सरकारला मिळेल. मुंबई राज्यांतील भूमिहीन शेतमजूर किंवा स्वतःची नाममात्र जमीन असणारांची संख्या ९८, ४५००० आहे म्हणजे हीं सुमारें १८ ते २० लाख कुटुंबें झालीं. जर सीलिंगमुळें २०–२५ लाख एकरच उपलब्ध होणार असेल तर दर भूमिहीन शेतमजूर कुटुंबामागें सरासरी १ ते १। एकर जमीन मिळेल. किंवा प्रत्येक कुटुंबाला किमान पांच एकर जमीन








द्यायची म्हटलें तर या उपलब्ध होणाऱ्या जमिनींत फक्त ४ ते ५ लाख कुटुंबांची सोय होईल. सुमारें १३ ते १५ लाख कुटुंबांची कांहींहि सोय होऊं शकणार नाहीं.

भूमिहीन शेतमजूर वा अल्पजमीनवाले यांना शेतींतून हुसकून लावणें शक्य नाहीं हें तर उघडच आहे. नुकतेंच सरकारच्या रोजगारी समितीनें असें जाहीर केलें आहे कीं तिसऱ्या योजनेंत आज सुचविला जातो तितका म्हणजे सुमारें दहा हजार कोटी रुपये भांडवलीखर्च केला तरी शहरी बेकारीचें आजचें प्रमाण कायमच राहील. म्हणजे भूमिहीन मंडळींना शहरांत उद्योग मिळूं शकणार नाहीं. मग शेतीतच जर त्यांना खपणें भाग असलें तर त्यांना रोजगारीची कांहीं किमान शाश्वति मिळवून देणें आवश्यक आहे. यासाठीं त्यांना स्वतःची हक्काची जमीन असायला हवी. अर्थात हक्काची म्हणजे अगदी स्वतःच्या मालकीचीच असली पाहिजे असें नव्हे. ही व्यवस्था सहकारी शेती-सोसायटीमार्फत करायला हरकत नाहीं पण भूमिहीनांच्या सोसायटीपाशी सभासद संख्येच्या प्रमाणांत पुरेशी जमीन असेल तरच सोसायटी रोजगारी शाश्वति देऊं शकेल तेव्हां अशा दर कुटुंबामागें किमान ४ ते ५ एकर जमीन सोसायटीकडे सरकारनें दिली पाहिजे.

याचा अर्थ असा होतो की भूमिहीनांचा प्रश्न सोडवणें हें सीलिंगविषयक कायद्याचें उद्दिष्ट असलें तर सीलिंगमुळें सुमारें एक कोटी एकर उपलब्ध होईल अशा प्रकारची तरतूद त्या कायद्यांत असली पाहिजे.

राज्यपुनर्रचनेनंतरच्या मुंबई राज्याची खातेदार गणनेची आंकडेवारी अद्याप उपलब्ध झालेली नाहीं. जुन्या मुंबईची ही आंकडेवारी मात्र आहे. नव्यानें आलेल्या प्रदेशांत जमीन मालकींतील विषमता जास्तच होती. तेव्हां जुन्या आंकडेवारीवरून कांहीं अंदाज बांधले तर ते फारसे चुकणार नाहींत असें वाटतें. जुन्या मुंबईत ३० एकरापेक्षा जास्त जमीन असणारे खातेदार ६·४ टक्के होते तर त्यांच्याकडील जमीन ३६·६ टक्के होती. सरासरी दर डोई क्षेत्रफळ व सीलिंगमुळें मान्य करण्यांत आलेली विषमता गृहीत धरल्यास या ६·४ टक्के खातेदारांकडे १५ टक्के जमीन ठेवणें योग्य होईल; आणि ३० एकरांचें सीलिंग बसविलें म्हणजे सुमारें २० टक्के जमीन उपलब्ध होईल. आजच्या परिस्थितींत २० टक्के म्हणजे मुंबई राज्यांत सुमारें एक कोटी दहा लाख एकर जमीन फेरवाटपांसाठीं मिळेल. तेव्हां भूमिहीनांचा प्रश्न सोडवायचा असेल तर सीलिंगची मर्यादा ही ३० एकरांच्या जवळपास असली पाहिजे.

आता पाणीपुरवठ्यानुसार होणाऱ्या जमिनीच्या वर्गवारीच्या संदर्भांत विचार करूं. पाणीपुरवठ्यानुसार जमिनीचे जिराईत ( dry ), निमबागाईत ( seasonally irrigated ) व बागाईत ( perennially irrisated ) असे तीन मुख्य वर्ग पडतात. शिवाय भातशेती निराळी. १९५६ च्या कूळकायद्यांत स्वतः कसणारांना कुळांकडून जमीन परत घ्यायची असली तर त्यासाठीं सीलिंग बसविण्यांत आलें होतें. ( कलम ३४ वें ) त्याचें प्रमाण जिराईत ४८ एकर; निमबागाईत २४ एकर व बागाईत १२ एकर असें होतें. आतां सरासरी ३० एकराच्या जवळपासचें सीलिंग बसवायचें असलें तर पुढील कोष्टक स्वीकारण्यास हरकत नाही. जिराईत- ३६ एकर, निमबागाईत–१८ एकर; बागाईत–९ एकर, भातशेतींत २४ ते ३६ एकरापर्यंतचें सीलिंग ठेवावें लागेल. मुंबई सरकारला जर खरोखर भूमिहीनांचा प्रश्न सोडवायचा असेल तर त्यांनीं सीलिंगचें हें कोष्टक स्वीकारणें आवश्यक आहे. रु. ७२०० च्या एकूण उत्पन्नाचें गणित सोडून द्यावें.

अर्थात् या विधेयकांत केवळ एवढाच एक बदल केल्यानें तें क्रांतिकारक ठरेल असें म्हणतां येणार नाही. कायद्याच्या भाषेला चोरवाटा-पळवाटांचा शापच असतो. तेव्हां बाकीच्या तरतुदींच्या बाबतींतहि बरीच दक्षता घेतली पाहिजे. त्यापैकी कांहीं मोजक्या बाबींचाच येथें विचार करतां येईल.

### या गोष्टीची काळजी घ्यायला हवी

सर्वांत महत्त्वाची बाब म्हणजे स्वतः कसणें याची व्याख्या. सीलिंगपर्यंतचें क्षेत्रफळ एका खातेदाराला आपल्या नांवें ठेवतां येणार आहे. तेव्हां या खातेदाराची व्याख्या अगदी कांटेकोरपणें झाली पाहिजे. प्रस्तुत विधेयकाच्या दुसऱ्या कलमांतील ११ व्या पोटकलमांत "स्वतः कसणाऱ्या" खातेदाराची जी व्याख्या दिली आहे त्यांत म्हटलें आहे कीं स्वतः कसणें म्हणजे स्वतः श्रम करणें किंवा स्वतःच्या कुटुंबीयांपैकी कोणी श्रम करणें किंवा स्वतःच्या किंवा स्वकुटुंबियांपकी कोणाच्या तरी देखरेखींखालीं शेती करवून घेणें होय.







हा जो शेवटचा पर्याय आहे तो अतिशय घातक आहे. शहरांतल्या वकिलाचा बाप किंवा भाऊ किंवा पुतण्या-भाचा खेड्यांत राहून आपली जमीन कसेल व या शहरस्थ नातलगाचीहि कसेल. १९५६ च्या कूळकायद्यांत शेतजमिनीपासून पांच मैलाच्या आंत राहण्याचें बंधनदेखील यांत घालण्यांत आलेलें नाहीं. तेव्हां या तरतुदीमुळें स्वतः कसणाऱ्या खातेदारांची व्याप्ति विनाकारणच बरीच मोठी राहूं शकेल, व विशेष म्हणजे अनुपस्थित मालकीला वरदान मिळेल.

तेव्हां स्वतः कसणें याच्या व्याख्येंत स्वतः कांही श्रम करणें, व सर्व देखरेख स्वतः करणें आणि शेतजमिनीपासून पांच मैलाच्या आंत राहणें या अटींचा अंतर्भाव व्हायला पाहिजे. याला अपवाद नेहमी विधवा, लहानमुलें ( minor ) यांचा करण्यांत येतो. विधवांचा अपवाद चालेल. पण लहान ( minor ) या ऐवजी 'अनाथ मूल' (orphan) अशी सुधारणा असावी. कारण गेल्या ८-१० वर्षांत जमिनीची बरीच विभागणी झाली आहे. नवी खरेदीदेखील कांही हिकमती लोकांनीं आपल्या अज्ञान मुलांच्या नांवानें केली आहे. अशांचा अपवाद केल्यानें त्या हिकमत्यांनेंच फावणार आहे. तेव्हां वाटेल त्या अज्ञान मुलाला ही सवलत देण्याऐवजी फक्त अनाथ मुलांना ही सवलत देण्यांत यावी.

तसेंच सीलिंगच्या अंमल बजावणींतून कांही विशिष्ट प्रकारच्या शेतीचा अपवाद करण्यांत आला आहे. कलम ३ मधील (f), (g) व (h) अन्वयें फळबागा, पानमळे, साखर-कारखान्यांच ऊंसमळे यांना ही सवलत देण्यात आली आहे. या बाबतींत प्रा. ध. रा. गाडगीळांनीं घेतलेला आक्षेप योग्य आहे. फळफळावळ, भाजीपाला, कॉफी यांच्याखालच्या जमिनींचा अपवाद करणें योग्य होणार नाही. फार तर कारखान्यांपुरती ही सूट द्यावी. कारण नाही तर खानदेशांतल्या बऱ्याच मोठ्या शेतजमिनीला सीलिंगमुळें धक्कासुद्धां लागणार नाहीं. तसेंच पुणें-मुंबई-नाशिक जवळचे मळेवालेहि सहीसलामत सुटतील. तर तें योग्य नाही. अशा पिकांचादेखील शेतींतच अंतर्भाव करण्यांत यावा. आणि जेथें कारखान्यांना किंवा तत्सम संस्थांना वगळावें लागलें तथ त्यांच्यावर शेती-उत्पन्न कर बसवावा. तसेच मजुरांच्या सुखसोयींबाबतच्या फॅक्टरी ॲक्टच्या तरतुदीहि लागूं कराव्यात.

सरकारजमा होणाऱ्या अतिरिक्त जमिनीच्या फेरवांटपाबाबतच्या तरतुदींत तर फारच मोठी गफलत झाली आहे असें दिसतें. या विधेयकाच्या कलम ३२ मधील पोटकलम १ (i) प्रमाणें अतिरिक्त जमिनीच्या फेरवांटपांत कूळकायद्याच्या अंमलबजावणीच्या वेळीं बेदखल झालेल्या कुळांना अग्रहक्क देण्यांत आला आहे. आणि १ (ii) अन्वयें शेतमजुरांच्या सोसायट्यांचा त्यानंतर नंबर लागतो. खरें म्हणजे बेदखल कुळांनादेखील भूमिहीन म्हणूनच समजण्यांत यावें व त्यांनाहि फक्त सरकारी सोसायटीमार्फतच जमीन मिळण्याची तरतूद करावी. व्यक्तिशः फेरवांटप अजिबात वर्ज्य मानलें पाहिजे.

शेवटीं प्रश्न राहतो अंमलबजावणीचा. सरकारतर्फें अनेक चांगले कायदे होत असले तरी अंमलबजावणीच्या आजच्या यंत्रणेमुळें व पद्धतीमुळें त्यांतून जुने प्रश्न सुटण्याऐवजी नवेच प्रश्न जास्त निर्माण होतात असा आपला अनुभव आहे. शिवाय लांचलुचपत वाढते तें निराळेंच. यामुळें कांही जण तर असेंच म्हणतात कीं जोपर्यंत अंमलबजावणीची चोख व्यवस्था आपल्याला करतां येत नाही तोपर्यंत असे कायदेदेखील करूं नयेत. बदलत्या समाजाला अशी एकांगी भूमिका कधीच घेतां येत नाहीं. समाज सुधारणेच्या दृष्टीनें आवश्यक असे पुरोगामी कार्यक्रम हातीं घेतलेच पाहिजेत व त्याचबरोबर अंमलबजावणींतहि जास्त जास्त सुधारणा करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

पण अशी सावधगिरी या विधेयकांत बाळगलेली दिसत नाहीं. सीलिंगच्या अंमलबजावणीचा सर्व भार मामलेदार, कलेक्टर व तत्सम अधिकाऱ्यांचीं ट्रिब्यूनल्स यांच्यावरच टाकण्यांत आला आहे. हें अगदीं अयोग्य होय. सुस्थिरतेच्या बाबतींत ही महसुली यंत्रणा गुणवान असली तर तिच्यांत दोषहि तितकेच शिरले आहेत. लाचलुचपतीचा प्रश्न अतिशय महत्वाचा असून देखील तो व्यक्तिनिष्ठ आहे म्हणून थोडावेळ बाजूला ठेवतां येईल. पण कार्यक्षमतेचें काय ? एक तर ही यंत्रणा सध्याच अनेक प्रकारच्या कामांच्या बोजाखालीं दबलेली आहे. याची जाणीव ए. डी. गोरवाला यांनीं आपल्या अहवा-







ल्यांत फार मागेंच दिली आहे. व ती वस्तुस्थितीच आहे. तेव्हां त्या यंत्रणेच्या बोजांत आणखी भर टाकल्यानें त्यांतल्या नोकरांना तर त्रास होईलच, पण या विधेयकाचा उद्देशहि सफल होणार नाहीं. वास्तविक हें काम चटकन उरकायला पाहिजे. पण महसुली यंत्रणेकडेच तें सोपवल्यावर तें निकडीनें पार पडण्याची आशा कशी धरतां येईल ? दुसरें, सीलिंगच्या कायद्याच्या अंमलबजावणीसाठीं केवळ महसुली ज्ञान पुरेसें नाहीं. शेती व अर्थशास्त्र यांचें विशेष ज्ञान असण्याची गरज आहे. महसुली यंत्रणेंतल्या सर्वच अधिकाऱ्यांना हें ज्ञान नाहीं. व त्यांना शिक्षण द्यायला फुरसत नाहीं.

म्हणून या कार्यक्रमासाठीं उच्चाधिकाऱ्यांची (commissioners) एक तात्पुरती संघटना उभारणें आवश्यक आहे. त्यांना विशेष शिक्षण देऊन कार्यक्षम बनवतां येईल. रूढ यंत्रणेशीं घनिष्ठ संबंध नसल्यानें त्यांना आपला कार्यक्रम झपाट्यानें पार पाडतां येईल. लाचलुचपतीलाहि आळा बसेल. जिथे कांहीं धोरणविषयक दुय्यम निर्णय घ्यावे लागतील तिथे अशा कमिशनर्सच्या मदतीला स्थानिक समित्या स्थापन कराव्यात आणि केवळ कारभारविषयक बाबतींत त्यांना विशेष अधिकार द्यावेत. अशी एखादी तरुणांची संघटना सरकारी पातळीवरच उभारतां आली तर त्यामुळें सीलिंगचा कार्यक्रम दोन वर्षांत संपेलच. शिवाय पुढील सहकारी शेतीच्या कार्यक्रमालाहि या संघटनेचा विशेष उपयोग होईल.

---

## पुस्तक-परामर्श -

**आहुति**- लेखक व प्रकाशक **श्री. स. शं. देसाई** माने मॅन्शन, फर्ग्युसन कॉलेज रोड, पुणें ४ ( १९५९ ) पानें २ + १६४ किं. रु. ३·५०

पोलिस कारवाई होण्यापूर्वीच्या हैदराबाद संस्थानांतील राजकीय परिस्थितीवर व घटनांवर प्रस्तुत कादंबरी आधारलेली आहे. १९४७ सालीं भारत स्वतंत्र झाल्यावर निझामांच्या डोक्यांत स्वातंत्र्याचें शिरलेलें वारें, त्यापायीं त्यानें केलेल्या कारवाया, त्याच्या प्रोत्साहनानें व संस्थानी सरकारच्या मदतीनें स्थापन झालेली धर्मवेडी रझाकार-संघटना व तिच्या माथेफिरू सैनिकांनीं घातलेला धुमाकूळ व केलेले अत्याचार व त्यामुळें त्रस्त झालेल्या जनतेनें सोसलेल्या यातना व कांहीं ठिकाणीं तिनें केलेला उत्स्फूर्त उठाव-यांचें एक धांवतें हृदयंगम चित्र आपणांस या कादंबरींतून पहावयास मिळतें. विशेषतः उस्मानाबाद व बिदर जिल्ह्यांतील लोकांच्या उठावाचें चित्रण लेखकानें केलें आहे. त्या भागांत समक्ष जाऊन जेथें त्या घटना घडल्या तीं ठिकाणें प्रत्यक्ष पहावयास व तेथील त्या वेळच्या घटनांचें रोमहर्षक वर्णन त्या अनुभवांतून गेलेल्या लोकांकडून लेखकास ऐकावयास मिळालें. त्याचा जो लेखकाच्या मनावर परिणाम झाला तो प्रस्तुत कादंबरींत उतरविण्याचा लेखकानें प्रयत्न केला आहे.

या कादंबरींत भूतपूर्व हैदराबाद संस्थानांतील राजकीय संघर्षांतून उत्पन्न झालेल्या सामाजिक उठावाला प्राधान्य आहे. व्यक्तिरेखांना प्राधान्य दिसून येत नाहीं. या उठावांत भाग घेतलेल्या कांहीं महत्त्वाच्या व्यक्तींना, केवळ त्यांच्या नांवांच्या जागीं फुल्या घालून, लेखकानें गुप्त ठेविलें आहे. तसें करणें लेखकास कांहीं राजकीय कारणास्तव आवश्यक वाटलें असावें. पण या व्यक्तिरेखाशून्य वर्णनामुळें कादंबरीच्या वाचकाचा अपेक्षाभंग होतो. तसें पहातां, सबंध कादंबरींतूनच, लक्षांत रहातील अशा ठसठशीत व्यक्तिरेखांचा अभाव जाणवल्याशिवाय रहात नाहीं. नाहीं म्हणावयास, नारायणराव पवार, संन्यासी नरसिंगबाबा, आनंदराव पाटील अशा कांहीं बलिदान करणाऱ्या व्यक्ती आपल्या व्यक्तित्वानें चमकून उठतात हें खरें. पण स्वतंत्र अशी त्यांची व्यक्तिरेखा रेखाटलेली दिसून येत नाहीं. जनतेच्या एका मोठ्या राजकीय उठावाचें व उद्रेकाचें त्या केवळ प्रतीक वाटतात. जणुं महत्त्व त्या वेळच्या उफाळून आलेल्या सामुदायिक भावनेला आहे, व्यक्तींना नाहीं असें लेखकास सुचवावयाचें असावें. जनता-उठावाच्या आरंभापासून पोलीस ॲक्शननें हैदराबादची रझाकारांच्या तावडींतून मुक्तता होईपर्यंत सबंध कादंबरीभर विश्वासराव पाटील हें पात्र वावरतांना दिसतें. त्याचें व्यक्तित्व तेजस्वी, त्यागी व विचारी असें दाखविलें आहे. परंतु त्याचें कार्य इतर म्होरक्यांच्या तुलनेनें, मागें मागें राहून झालेलें दाखविल्यामुळें त्याचीहि व्यक्तिरेखा प्रभावी वाटत नाहीं. कादंबरींत जीं कांहीं थोडीं स्त्रीपात्रें आलीं आहेत त्यांचें स्वभावरेखन तर अगदींच फिकें वाटतें. तरीपण कादंबरींतून अपेक्षिलेल्या प्रभावी व्यक्तिरेखनाचा अभाव असूनहि, त्या काळांत एखाद्या नैसर्गिक उत्पाताप्रमाणें घडलेल्या घटना व त्यामागील सामुदायिक भावनेचा उद्रेक लेखकानें टिपून घेतलेला इतका प्रभावी वाटतो कीं, विशेष कलात्मकतेचा आविष्कार नसतांहि ही कादंबरी वाचनीय झाली आहे. आतां भूतकाळांत जमा झालेल्या हैदराबाद संस्थानाच्या इतिहासांतील एका अखेरीच्या पर्वांतील ऐतिहासिक घटनांवर आधारलेली म्हणून या कादंबरीला आगळें वैशिष्ट्य राहील यांत शंका नाहीं.

— - वि. म. बेडेकर










# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला



अनुक्रमणिका

नव्या
र्षाचें
थाटाचें
स्वागत

दिवाळी आली आहे. प्रत्येक घराची शोभा वाढविणाऱ्या दीपज्योतींनी...नव्या वर्षाच्या आगमनाच्या आनंदानें अंतरी तेवणाऱ्या दीपज्योतींनीं...सर्व देश कसा उजळून निघाला आहे.

तुम्हीं आणि तुमचे कुटुंबीय ह्या सुखद प्रसंगी प्रफुल्लित दिसता आहांत... त्याला शोभेशीं मफतलाल कापडापासून बनविलेलीं वस्त्रें परिधान केलीं आहेत. अशी खास व रोजची गरज भागविण्याच्या हेतूनेंच मफतलाल कापड तयार केलें जातें.

प्रत्येकाच्या पसंतीस उतरेल व खिशास परवडेल अशा व्यापक प्रमाणावर विविध तऱ्हांचें व प्रतीचें कापड मफतलाल समूहांतील गिरण्या तयार करतात.

**मफतलाल ग्रुप मिल्स**
राष्ट्रासाठीं कापड

मफतलाल हौस, बॅकबे रेक्लमेशन, मुंबई १

मफतलाल यांचे इतर उद्योग: सालर व रंग

न्यू युनियन, शोरॉक, अहमदाबाद. न्यू शोरॉक, नडियाद. स्टँडर्ड, मुंबई. न्यू चायना, मुंबई. ससून, मुंबई. इंदूर. सुरत कॉटन, सुरत आणि देवास. मफतलाल फाइन, नवसारी. मगनभाई ज्यूट, कलकत्ता.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष